॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ नवमोऽध्यायः

## अवतरणिका

*सातव्या अध्यायात भगवंताकडून विज्ञानासहित ज्ञान सांगण्याचा जो प्रवाह चालू होता, त्याच्यात मध्येच आठव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाने सात प्रश्न विचारले. त्यापैकी सहा प्रश्नांची उत्तरे भगवंतांनी संक्षेपाने देऊन अंतकालीन गतिविषयक सातव्या प्रश्नाचे उत्तर विस्ताराने दिले.*

*आता सातव्या अध्यायात सांगण्याचे राहिलेल्या, त्याच विज्ञानासहित ज्ञानाच्या विषयाला, विलक्षण रीतीने सांगण्यासाठी भगवान् नवव्या अध्यायाचा विषय आरंभ करतात.*

*श्रीभगवानुवाच*

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥ १ ॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इदम्** | = हे | **ते** | = तुझ्यासाठी | **ज्ञात्वा** | = जाणून (तू) |
| **गुह्यतमम्** | = अत्यंत गुप्त | **तु** | = तर (मी पुन्हा) | **अशुभात्** | = अशुभापासून अर्थात् जन्म-मरणरूप संसारापासून |
| **विज्ञानसहितम्** | = विज्ञानासहित | **प्रवक्ष्यामि** | = चांगल्या प्रकारे सांगेन, | | |
| **ज्ञानम्** | = ज्ञान | | | | |
| **अनसूयवे** | = दोषदृष्टिरहित | **यत्** | = ज्याला | **मोक्ष्यसे** | = मुक्त होशील. |

*व्याख्या*— **इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूये**— भगवंताच्या मनात ज्या तत्त्वाला, विषयाला सांगण्याची इच्छा आहे त्याकडे लक्ष वेधण्यासाठीच भगवान् सर्वात प्रथम "**इदम्**" (हे) शब्दाचा प्रयोग करतात. त्या (भगवंताच्या मन-बुद्धीत स्थित असलेले) तत्त्वाचे माहात्म्य सांगण्यासाठीच त्याला "**गुह्यतमम्**" म्हटले आहे अर्थात् ते तत्त्व अत्यंत गोपनीय आहे. यालाच पुढील श्लोकात "**राजगुह्यम्**" आणि अठराव्या अध्यायाच्या चौसष्टाव्या श्लोकात "**सर्वगुह्यतमम्**" म्हटले आहे.

येथे प्रथम "**गुह्यतमम्**" म्हणून नंतर (९।३४ मध्ये) "**मन्मना भव.......**" म्हटले आहे आणि अठराव्या अध्यायात प्रथम "**सर्वगुह्यतमम्**" म्हणून नंतर (१८।६५ मध्ये) "**मन्मना भव......**" म्हटले आहे. तात्पर्य, येथील आणि तेथील विषय एकच आहेत, दोन नव्हेत.

हे अत्यंत गोपनीय तत्त्व प्रत्येकाला सांगितले जाऊ शकत नाही, कारण यात भगवंतांनी आपला स्वतःचा महिमा वर्णन केला आहे. ज्याच्या अंतःकरणात भगवंताविषयी थोडीदेखील दोषदृष्टी असेल, त्याला जर अशी गोपनीय गोष्ट सांगितली गेली तर तो "भगवान् स्वतःचीच प्रशंसा करणारे आत्मश्लाघी आहेत" असा उलटा अर्थ करू शकतो. याच मुद्याला समोर ठेवून भगवान् अर्जुनाला "**अनसूयवे**" विशेषण देऊन म्हणतात की, "बंधू! तू दोष-दृष्टिरहित आहेस म्हणून मी तुला अत्यंत गोपनीय गोष्ट पुन्हा उत्तम प्रकारे सांगतो अर्थात् त्या तत्त्वालाही सांगतो आणि त्याच्यासाठी आवश्यक असलेल्या उपायांनाही सांगतो— "**प्रवक्ष्यामि**"

"**प्रवक्ष्यामि**" पदाचा दुसरा भाव असा आहे की, मी त्या विषयाला विलक्षण रीतीने आणि स्पष्ट करून सांगेन अर्थात् प्रत्येक मनुष्य मला शरण येण्याचा अधिकारी आहे. मग तो कितीही दुराचारी, पापी असो तसेच कोणत्याही वर्णाचा, आश्रमाचा, संपद्रायाचा, देशाचा, वेशाचा, कोणीही का असेना, तोही मला शरण येऊन माझी प्राप्ती करून घेतो— ही गोष्ट मी विशेष स्पष्ट करून सांगेन.

सातव्या अध्यायात भगवंताच्या मनात जितक्या गोष्टी

सांगावयाच्या होत्या, तितक्या गोष्टी ते सांगू शकले नाहीत. म्हणून भगवान् येथे ''तु'' पद देतात की त्याच विषयाला मी पुन्हा सांगेन.

**ज्ञानं विज्ञानसहितम्**—भगवंत ह्या संपूर्ण जगताचे महाकारण आहेत—असे दृढतेने मानणे ''ज्ञान'' आहे आणि भगवंताशिवाय दुसरे कोणतेही (कार्य-कारण) तत्त्व नाही—असा अनुभव होणे ''विज्ञान'' आहे. या विज्ञानासह ज्ञानासाठीच या श्लोकाच्या पूर्वार्धात ''**इदम्**'' आणि ''**गुह्यतमम्**'' ही दोन विशेषणे आलेली आहेत.

## ज्ञान आणि विज्ञानासंबंधी विशेष संकेत

या ज्ञान-विज्ञानाला जाणून घेऊन तू अशुभ असलेल्या संसारापासून मुक्त होशील. हे ज्ञान-विज्ञानच राजविद्या, राजगुह्य इत्यादी आहे. ह्या धर्मावर जे श्रद्धा ठेवत नाहीत, यावर विश्वास करत नाहीत, याला मानीत नाहीत ते मृत्युरूपी संसाराच्या मार्गात पडतात आणि वारंवार जन्मत-मरत राहतात. (९।१-३) असे म्हणून भगवंतांनी ''ज्ञान'' सांगितले. अव्यक्तमूर्ती माझ्यानेच हा संपूर्ण संसार व्यापून आहे अर्थात् सर्व काही मीच मी आहे. दुसरा कोणी मुळीच नाही (९।४-६) असे म्हणून भगवंतांनी विज्ञान सांगितले.

प्रकृतीला परवश झालेले संपूर्ण प्राणी महाप्रलयात माझ्या प्रकृतीला प्राप्त होतात आणि महासर्गाच्या आरंभी मी पुन्हा त्यांची रचना करत असतो. परंतु ती कर्म मला बांधत नाहीत. त्याविषयी मी उदासीनाप्रमाणे अनासक्त राहत असतो. माझ्या अध्यक्षतेखाली प्रकृती संपूर्ण प्राण्यांची रचना करत असते. माझ्या परमभावाला न जाणून अज्ञानी लोक माझी अवहेलना करतात. राक्षसी, आसुरी आणि मोहिनी प्रकृतीचा आश्रय घेणाऱ्यांच्या आशा, कर्म आणि ज्ञान सर्व व्यर्थ आहेत. महात्मालोक दैवी प्रकृतीचा आश्रय घेऊन आणि मला संपूर्ण प्राण्यांचा आदि मानून माझे भजन करत असतात, मला नमस्कार करतात. कित्येक ज्ञानयज्ञद्वारा एकीभावाने माझी उपासना करतात इत्यादी इत्यादी. (९।७-१५) असे म्हणून भगवंताने ''ज्ञान'' सांगितले. मीच क्रतु, यज्ञ, स्वधा औषध इत्यादी आहे आणि सत् असत्‌ही मीच आहे अर्थात् कार्यकारणरूपाने जे काही आहे ते सर्व मीच आहे (९।१६-१९) असे म्हणून विज्ञान सांगितले.

जे यज्ञ करून स्वर्गाला जातात ते तेथे सुख भोगतात आणि पुण्य संपल्यावर पुन्हा परत मृत्युलोकात येतात. अनन्यभावाने माझे चिंतन करणाऱ्यांचा योगक्षेम मी स्वत: चालवतो. श्रद्धेने इतर देवतांचे पूजन करणारे वास्तविक माझेच पूजन करतात परंतु अविधीपूर्वक करतात. जे मला संपूर्ण यज्ञांचा भोक्ता आणि स्वामी मानीत नाहीत त्यांचे पतन होते. जे श्रद्धा प्रेमपूर्वक पत्र-पुष्प इत्यादीना तसेच संपूर्ण क्रियांना मला अर्पण करतात ते शुभाशुभ कर्मातून मुक्त होतात-(९।२०-२८) असे म्हणून भगवंतांनी ''ज्ञान'' सांगितले. मी संपूर्ण भूतात सम आहे. माझा कोणीही प्रेमी किंवा द्वेषी नाही परंतु जे माझे भजन करतात ते माझ्यात आणि मी त्यांच्यात असतो (९।२९) असे म्हणून ''विज्ञान'' सांगितले. या पुढचे पाच श्लोक (९।३०-३४) या विज्ञानाच्या व्याख्येतच सांगितले गेले आहेत.*

**यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्**—असत्‌शी संबंध जोडणेच ''अशुभ'' आहे, जे उच्च-नीच योनीत जन्म घेण्याला कारणीभूत असते. असत्‌शी (संसार) आपला संबंध मानलेला आहे वास्तविक नव्हे. ज्याच्याशी वास्तविक संबंध नसतो त्यापासूनच मुक्ती होते. आपल्या स्वरूपापासून कधी कोणाची मुक्ती होत नसते. म्हणून मुक्ती त्यापासूनच होते, जे आपले नसते, परंतु अज्ञानाने त्याला आपले मानले आहे. ह्या अज्ञानजनित मान्यतेपासूनच मुक्ती होत असते. अज्ञानजनित मान्यतेला न मानण्यानेच त्यापासून मुक्ती होते. जसे वस्त्राला मळ लागला तर त्याला धुतले जाते तेव्हा मळ निघून जातो. कारण मळ आगंतुक आहे आणि मळाच्या सापेक्षात कपडा आधीपासून आहे अर्थात् मळ आणि वस्त्र दोन आहेत एक नव्हेत. तसेच भगवंताचा अविनाशी अंश हा जीव भगवंताला विमुख होऊन ज्या कोण्या योनीत जातो, तिथेच मी, माझेपणा करून शरीर संसाराशी संबंध जोडून घेतो अर्थात् मळ लावून घेतो आणि जन्मत-मरत राहतो. जेव्हा हा आपल्या स्वरूपाला जाणून घेतो अथवा भगवंताला सम्मुख होतो तेव्हा हा अशुभ संबंधापासून मुक्त होतो अर्थात् त्याचा संसाराशी संबंध-विच्छेद होतो. याच भावाच्या दृष्टिकोनातून भगवान् येथे अर्जुनाला म्हणतात की, या तत्त्वाला जाणून घेऊन तू अशुभापासून मुक्त होशील.

**परिशिष्ट भाव**—संसार 'प्रकट' आहे. कर्मयोग (निष्कामभाव) प्रकट नसल्याने 'गुह्य' आहे. त्यापेक्षाही गुप्त असल्याने ज्ञानयोग (आत्मज्ञान) 'गुह्यतर' आहे. ज्ञानयोगापेक्षाही गुप्त असल्याने भक्तियोग (परमात्मज्ञान) 'गुह्यतम्' आहे. गुह्य आणि गुह्यतर तर लौकिक आहेत परंतु गुह्यतम अलौकिक आहे.

* येथे ज्ञानाच्या वर्णनात विज्ञान आणि विज्ञानाच्या वर्णनात ज्ञान नाही—अशी गोष्ट नाही.

ब्रह्मलोकापर्यंतचे सर्वच लोक पुनरावर्ती असल्यामुळे 'अशुभ' आहेत (गीता ८ । १६). गुह्यतम विषय जाणल्यास मनुष्य अशुभापासून संपूर्णपणे मुक्त होतो. अशुभापासून मुक्ती तर कर्मयोग आणि ज्ञानयोग यांनीही होते. परंतु येथे अशुभापासून मुक्ती होण्याचे तात्पर्य आहे—एका परमात्म्याशिवाय दुसऱ्याची किंचिन्मात्रही सत्ता राहू नये. अहम्‌चा सूक्ष्म गंधही राहू नये, ज्यामुळे दार्शनिक मतभेद उत्पन्न होतात.

स्वतःच्या स्वरूपाला जाणणे 'ज्ञान' आहे आणि समग्र भगवंताला जाणणे 'विज्ञान' आहे. निर्गुणाच्या अंतर्गत तर सगुणा (समग्र) येऊ शकत नाही. परंतु सगुणाच्या अंतर्गत निर्गुणही येते. म्हणून सगुणाचे ज्ञान 'विज्ञान' अर्थात् विशेष ज्ञान आहे.

***संबंध*—*पूर्वश्लोकात विज्ञानासह ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा करून त्याचा परिणाम अशुभापासून मुक्त होणे सांगितला. आता पुढील श्लोकात त्याच विज्ञानासहित ज्ञानाचे माहात्म्य वर्णन करतात.***

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्॥ २॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इदम्** | = हे (विज्ञानासहित ज्ञान अर्थात् समग्ररूप) | **पवित्रम्** | = हे अती पवित्र (आणि) | **अव्ययम्** | = अविनाशी आहे (आणि) |
| **राजविद्या** | = संपूर्ण विद्यांचा राजा (आणि) | **उत्तमम्** | = अतिश्रेष्ठ आहे (आणि) | **कर्तुम्** | = करण्यास |
| **राजगुह्यम्** | = संपूर्ण गुह्यांचा राजा आहे. | **प्रत्यक्षावगमम्** | = याचे फलसुद्धा प्रत्यक्ष आहे | **सुसुखम्** | = फार सोपे आहे अर्थात् हे प्राप्त करणे फार सोपे आहे. |
| | | **धर्म्यम्** | = हे धर्ममय आहे, | | |

***व्याख्या*— राजविद्या—**हे विज्ञानसहित ज्ञान संपूर्ण विद्यांचा राजा आहे, कारण याला योग्य रीतीने जाणून घेतल्यास, काहीही जाणून घ्यावयाचे बाकी राहत नाही.

भगवंतांनी सातव्या अध्यायाच्या आरंभी म्हटले आहे की "माझ्या समग्ररूपाला जाणल्यावर, जाणून घेतल्यावर, जाणण्याचे काही शिल्लक राहत नाही"-पंधराव्या अध्यायाच्या शेवटी म्हटले आहे की "जो असम्मूढ पुरुष मला क्षराहून अतीत आणि अक्षराहून उत्तम जाणतो, तो सर्ववित् होतो अर्थात् त्याला जाणण्याचे काही बाकी राहत नाही" यावरुन असे दिसते की, भगवंताची सगुण-निर्गुण, साकार-निराकार, व्यक्त-अव्यक्त, इत्यादी जितकी स्वरूपे आहेत, त्या सर्व स्वरूपांपैकी भगवंताच्या सगुण-साकार स्वरूपाचे फारच विशेष माहात्म्य आहे.

**राजगुह्यम्**—संसारात रहस्यमय जितक्या काही गुप्त गोष्टी आहेत त्या सर्व गोष्टींचा हा राजा आहे. कारण संसारात यापेक्षा मोठी दुसरी कोणतीही रहस्याची गोष्ट नाहीच.

जसे नाटकात सर्वासमोर काम करत असताना एखाद्या पात्राने जर आपला मूळ परिचय दिला तर त्याचा परिचय देणे विशेष गोपनीय गोष्ट असते कारण तो नाटकात ज्या पात्राचे काम करतो, त्यावेळी तो आपले मूळ स्वरूप लपवत असतो. तसेच जेव्हा भगवान् मनुष्यरूपात लीला करतात तेव्हा अभक्त लोक त्यांना मनुष्य समजून त्यांची अवज्ञा करतात. म्हणून भगवान् त्यांच्यासमोर आपल्या स्वतःला प्रगट करीत नाहीत. (७ । २५) परंतु जे भगवंताचे अनन्य आवडते भक्त असतात त्यांच्यासमोर भगवान् स्वतः आपल्याला प्रगट करतात. स्वतः आपल्याला प्रगट करणे हीच गोष्ट अत्यंत गोपनीय आहे.

**पवित्रमिदम्**—या विद्येसारखी पवित्र करणारी दुसरी कोणतीही विद्या नाहीच. अर्थात् ही विद्या पवित्रतेची अंतिम सीमा आहे. पाप्यातला पापी आणि अतिदुराचारीही या विद्येने फार लवकर धर्मात्मा बनतो अर्थात् पवित्र होतो आणि शाश्वत शांतीला प्राप्त करून घेतो. (९ । ३१)

दहाव्या अध्यायात अर्जुनाने भगवंताला परम पवित्र म्हटले "**पवित्रं परमं भवान्**" (१० । १२), चौथ्या अध्यायात भगवंतांनी ज्ञानाला पवित्र म्हटले "**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते**" (४ । ३८) आणि या ठिकाणी राजविद्या इत्यादी आठ विशेषणे देऊन विज्ञानसहित ज्ञानाला पवित्र सांगतात. याचे तात्पर्य, पवित्र परमात्म्याचे नाव, रूप, लीला, धाम, स्मरण, कीर्तन, जप, ध्यान, ज्ञान इत्यादी सर्व पवित्र आहेत अर्थात् भगवत्संबंधी जे काही आहे ते सर्व अत्यंत पवित्र आहे आणि प्राणीमात्राला पवित्र करणारे आहे.*

**उत्तमम्**—हे सर्वश्रेष्ठ आहे. याच्या तुलनेत दुसरी

* अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा। यः स्मरेत् पुण्डरीकाक्षं स बाह्याभ्यतरः शुचिः॥ (ब्रह्मवैवर्तपुराण ब्रम्ह० १७ । १७)

कोणती वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादी नाहीच. ही श्रेष्ठतेची शेवटची सीमा आहे. कारण या विद्येने माझा भक्त सर्वश्रेष्ठ होतो. एवढा श्रेष्ठ होतो की मीसुद्धा त्याची आज्ञा पाळतो.

या विज्ञानसहित ज्ञानाला जाणून घेऊन जे मनुष्य याचा अनुभव घेतात त्यांच्यासाठी भगवान् म्हणतात की ''मी त्यांच्यात असतो आणि ते माझ्यात असतात.'' ''**मयि ते तेषु चाप्यहम्**''(९।२९)अर्थात् ते माझ्यात तल्लीन होऊन माझे स्वरूपच बनतात.

**प्रत्यक्षावगमम्**—याचे फल प्रत्यक्ष आहे. जो मनुष्य ह्या गोष्टीला जितके समजून घेईल तो तितकाच आपल्यात विलक्षणतेचा अनुभव करील. या गोष्टीला जाणून घेताच परमगती प्राप्त होते—हे त्याचे प्रत्यक्ष फल आहे.

**धर्म्यम्**—हे धर्ममय आहे. परमात्म्याचे लक्ष्य झाल्यावर निष्कामभावपूर्वक जितकी काही कर्तव्यकर्म केली जातात ती सर्वची सर्व या धर्माच्या अंतर्गत येतात म्हणून हे विज्ञान-सहित ज्ञान सर्व धर्मांनी परिपूर्ण आहे.

दुसऱ्या अध्यायात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे की, या धर्ममय युद्धाशिवाय क्षत्रियासाठी दुसरे कोणतेही श्रेयस्कर साधन नाही—''**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते**'' (२।३१) यावरुन हेच सिद्ध होते की, आपापल्या वर्ण आश्रमानुसार शास्त्रविहित, जितकी काही कर्तव्यकर्म आहेत ती सर्व धर्म्य आहेत. याशिवाय भगवत्प्राप्तीची जितकी काही साधने आहेत आणि भक्तांची जितकी लक्षणे आहेत, त्या सर्वांचे नाव भगवंतांनी ''धर्म्यामृत'' ठेवले आहे (१२।२०) अर्थात् ही सर्व भगवत्प्राप्ती करून देणारी असल्याने धर्ममय आहेत.

**अव्ययम्**—यात कधी किंचित्मात्र न्यूनता येत नाही. म्हणून हे अविनाशी आहे. भगवंतांनी आपल्या भक्तासाठी-ही म्हटले आहे की ''माझ्या भक्ताचा विनाश (पतन) होत नाही''—''**न मे भक्तः प्रणश्यति**'' (९।३१)

**कर्तुं सुसुखम्**—हे आचरण करण्यास खूप सुगम आहे. पत्र, पुष्प, फल, जल इत्यादी वस्तूंना भगवंताचीच समजून भगवंताला देणे किती सोपे आहे (९।२६) वस्तूंना आपली मानून भगवंताला अर्पण करण्याने भगवान् त्यांना अनंत पटीने परत करतात आणि त्यांना भगवंताचीच समजून भगवंताला अर्पण केल्यास भगवान् स्वतः आपल्याला देऊन टाकतात. यात काय परिश्रम लागले? यात तर केवळ आपले अज्ञान घालवायचे आहे.

माझी प्राप्ती सोपी आहे, सरळ आहे कारण मी सर्व देशात आहे तर येथेही आहे, सर्वकालात आहे तर आत्ताही आहे, जे काही पाहणे, ऐकणे, समजणे यात जे काही येते त्यात मीच आहे. जितकी काही माणसे आहेत त्यांचा मी आहे आणि ते माझे आहेत. परंतु माझ्याकडे दृष्टी न ठेवता प्रकृतीकडे दृष्टी राहिल्याने ते मला प्राप्त न होता वारंवार जन्मत-मरत राहतात. जर त्यांनी माझ्याकडे थोडे जरी पाहिले तर त्यांना माझी अलौकिकता, विलक्षणता दिसते. तसेच प्रकृतीशी आपला संबंध नाही आणि भगवंताशी आपला घनिष्ट संबंध आहे याचा अनुभव येतो.

**परिशिष्ट भाव**—कर्मयोग आणि ज्ञानयोग 'राजविद्या' आहे आणि भक्तियोग 'राजगुह्य' आहे. याच अध्यायाच्या चौथ्या-पाचव्या श्लोकात राजविद्येचा विषय आणि चौतीसाव्या श्लोकात राजगुह्याचा विषय मुख्यतेने सांगितला गेला आहे.

'**प्रत्यक्षावगमम्**'—याचे प्रत्यक्ष (अपरोक्ष) फल प्राप्त होते. कर्मयोगाने शांती, ज्ञानयोगाने मुक्ती आणि भक्तियोगाने प्रेम प्रत्यक्ष प्राप्त होते. भगवंताला शरणागत झाल्यावर निर्भयता, निःशोकता, निश्चिंतता आणि निःशंकता प्रत्यक्षात प्राप्त होते. आपल्या स्वरूपाची सत्ता-स्फूर्ती (सत्-चित्), स्वतःच्या असणेपणाचे ज्ञान (अनुभव) सुद्धा प्रत्यक्ष आहे.

'**धर्म्यम्**'—हे धर्मरहित नाही, तर धर्ममय आहे, धर्माने ओतप्रोत आहे. याला जाणल्यास मनुष्यजीवन सफल होते अर्थात् मनुष्य कृतकृत्य, ज्ञान-ज्ञातव्य आणि प्राप्त-प्राप्तव्य होतो.

'**सुसुखं कर्तुम्**'—हे करण्यास फार सोपे आहे कारण हे सहज प्राप्त आहे. सर्व काही परमात्माच आहे—यात काही परिश्रम नाही, ही तर केवळ स्वीकृती आहे. कर्मयोगाच्या दृष्टीने जी वस्तू आपली नाही, तर दुसऱ्याची आहे, ती दुसऱ्याच्या सेवेत लावण्यात काय अवघड आहे! ज्ञानयोगाच्या दृष्टीने आपल्या स्वतःत स्थित होण्यात काय अवघड आहे! भक्तियोगाच्या दृष्टीने जे आपले आहे त्याच्याकडे जाण्यात काय अवघड आहे! ही सर्व कामे सुखपूर्वक होतात.

'**अव्ययम्**'—वास्तविक अविनाशी आणि अंतिम तत्त्व हेच आहे. याच्या पलीकडे काहीही नाही.

***संबंध***—*अशी सोपी आणि सर्वोपरी विद्या असताना लोक तिचा लाभ का घेत नाहीत? यावर म्हणतात.*

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि॥ ३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परन्तप** | = हे परंतप! | **पुरुषाः** | = माणसे | | संसाराच्या मार्गात |
| **अस्य** | = या | **माम्** | = मला | **निवर्तन्ते** | = परत येत राहतात |
| **धर्मस्य** | = धर्म माहात्म्यावर | **अप्राप्य** | = प्राप्त न होता | | अर्थात वारंवार |
| **अश्रद्दधानाः** | = श्रद्धा न ठेवणारी | **मृत्युसंसारवर्त्मनि** | = मृत्युरूपी | | जन्मत-मरत राहतात. |

*व्याख्या*— **अश्रद्धधानाः पुरुषा धर्मास्यास्य* परन्तप**— धर्म दोन प्रकारचा असतो. स्वधर्म आणि परधर्म. मनुष्याचे जे आपले स्वतःसिद्ध स्वरूप आहे ते त्याच्यासाठी स्वधर्म आहे आणि प्रकृती आणि प्रकृतीचे सर्व कार्य त्याच्यासाठी परधर्म आहे—"**संसारधर्मैरविमुह्यमानः**" (श्रीमद्भा० ११।२।४९) मागील दोन श्लोकांत भगवंतांनी जे विज्ञानासहित ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा केली आणि राजविद्या इत्यादी आठ विशेषणांनी ज्याचे फार मोठे माहात्म्य सांगितले, त्यालाच येथे "**धर्म**" म्हटले गेले आहे. या धर्माच्या माहात्म्यावर श्रद्धा न ठेवणाऱ्या अर्थात् उत्पत्ति-विनाशशील पदार्थांना खरे समजून त्यातच गढून जाणाऱ्या मनुष्यांना येथे "**अश्रद्दधानाः**" म्हटले गेले आहे.

ही एक फार मोठी आश्चर्याची गोष्ट आहे की, मनुष्य आपल्या शरीराला, कुटुंबाला, धन-संपत्ती वैभवाला निः-सन्देहरूपाने उत्पत्ति-विनाशशील आणि प्रत्येक क्षणाला परिवर्तनशील जाणत असतांनाही त्यांच्यावर विश्वास ठेवतात, श्रद्धा करतात, त्यांचा आश्रय घेतात. ते असा विचार करत नाहीत की, या शरीरादीबरोबर आपण किती दिवस राहू आणि हे आमच्याबरोबर किती दिवस राहतील? श्रद्धा तर स्वधर्मावर ठेवावयास पाहिजे होती पण ती झाली परधर्मावर!

**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि**—परधर्मावर श्रद्धा ठेवणाऱ्यासाठी भगवान् म्हणतात की, सर्व देशात, सर्व काळात संपूर्ण वस्तूत, संपूर्ण व्यक्तीत नित्य सर्वकाळ विद्यमान असलेल्या, सर्वांना नित्यप्राप्त असलेल्या मला प्राप्त न करता माणसे मृत्युरूपी संसाराच्या रस्त्याने वाटचाल करतात. कुठे जन्मले तर मरणे बाकी राहते आणि मेले तर जन्मणे बाकी राहते. हे ज्या योनीत जातात, त्याच योनीत आपली स्थिती मानतात अर्थात् "मी शरीर आहे" अशी अहंता आणि "शरीर माझे आहे" अशी ममता करून बसतात. परंतु वास्तविक त्या योनीशीही त्यांचा निरंतर संबंध-विच्छेद होत राहतो. कोणत्याही योनीशी यांचा संबंध टिकू शकत नाही. देश, काल, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीशीही त्यांचा निरंतर संबंध-विच्छेद होत आहे अर्थात् हे तेथूनही निरंतर निवृत्त होत असतात, परततात. हे कोणाशीही कायमचे संबंध ठेवू शकत नाहीत. त्याचप्रमाणे हे जरी ऊर्ध्वगतीला अर्थात् उच्च भोगभूमीत गेले तरी, त्यांना तेथून परत मागे यावेच लागते. (८।१६, २५; ९।२१) तात्पर्य, मला प्राप्त करून घेतल्याशिवाय ही माणसे जेथे जेथे जातील, तेथून त्यांना परत यावेच लागेल, वारंवार जन्मावे आणि मरावेच लागेल.

**मृत्युसंसारवर्त्मनि**—हे म्हणण्याचे कारण संसाराच्या मार्गात केवळ मरणेच मरणे आहे, विनाशच विनाश आहे, अभावच अभाव आहे अर्थात् जेथे जाल तेथून परतावेच लागेल. याच विषयाला भगवंतांनी बाराव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात "**मृत्युसंसारसागरात्**" म्हटले आहे अर्थात् हा संसार मृत्यूचा समुद्रच आहे. या ठिकाणी कुठेही स्थिरतेने टिकून राहणे शक्य नाही.

हे मनुष्यशरीर केवळ परमात्मप्राप्तीसाठी मिळालेले आहे. भगवंतांनी कृपा करून संपूर्ण कर्मफलांना (जे सत् असत् योनीचे कारण आहेत) स्थगित करून मुक्तीचा अवसर दिला आहे. अशा मुक्तीच्या संधीला प्राप्त करूनही जे जीव जन्म-मरणाच्या परंपरेत चालत राहतात, त्यांना पाहून जणू भगवंत पश्चात्ताप करतात की, मी यांना आपल्याकडून जन्म-मरणातून सुटण्याचा पूर्ण अवसर दिला होता परंतु हे त्या संधीला प्राप्त करूनही जन्म-मरणाकडेच वाटचाल करत आहेत. केवळ सामान्य माणसासाठीच नव्हे तर महान् आसुरी योनीत पडलेल्या जीवासाठीही भगवान् पश्चात्ताप करतात की, मला प्राप्त न करताच हे अधम गतीला जात आहेत—"**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्**" (१६।२०)

**अप्राप्य माम्**—(मला प्राप्त न होता) पदांनी हे सिद्ध होते की, सर्व मानवांना भगवत्प्राप्तीचा अधिकार मिळालेला आहे म्हणून सर्व माणसे भगवंताकडे वाटचाल करू शकतात, भगवंताला प्राप्त करू शकतात. सोळाव्या अध्यायाच्या विसाव्या श्लोकात "**मामप्राप्यैव**" पदानेही हे सिद्ध होते की, आसुरी प्रकृती असणारेसुद्धा भगवंताकडे वाटचाल करू शकतात, भगवंताला प्राप्त करू शकतात. म्हणून गीतेत म्हटले गेले

* येथे "अश्रद्दधानाः" पदात आलेल्या "ज्ञानच् कृत्" प्रत्ययाच्या योगात "न लोकाव्ययनिष्ठाखलर्थतृनाम्" (पाणि० अष्टा० २।३।६९) या सूत्राच्या नियमाने द्वितीया विभक्ती व्हावयास पाहिजे, परंतु हे सूत्र कारक-षष्ठीचेही निषेध करते. म्हणून येथे शेष षष्ठीने "धर्म" पदात षष्ठी विभक्ती केली गेली आहे.

आहे की, अत्यंत दुराचारीही भक्त होऊ शकतो, धर्मात्मा होऊ शकतो आणि भगवंताला प्राप्त करू शकतो.(९।३०-३१) तसेच पाप्यातला पापीही ज्ञानाने संपूर्ण पापापासून मुक्त होऊ शकतो (४।३६)

एक शहर होते. त्याच्या चहूबाजूंनी भिंत बांधलेली होती. शहरातून बाहेर निघण्यासाठी एकच दरवाजा होता. एक आंधळा शहरातून बाहेर पडू इच्छित होता. तो एका हाताने काठीचा आश्रय व दुसऱ्या हाताने भिंतीचा आश्रय घेत चालला होता. जात जात जेव्हा बाहेर जाण्याचा दरवाजा आला तेव्हा त्याच्या डोक्याला खाज आली. तो एका हाताने डोके खाजवीत आणि एका हाताने काठीच्या आधाराने चालत राहिला. तो दरवाजा निघून गेला आणि त्याचा हात पुन्हा भिंतीशी लागला. अशा रीतीने चालत चालत जेव्हा दरवाजा येतो तेव्हा खाज येते. खाजविण्यासाठी हात डोक्याला लावतो तेवढ्यात दरवाजा निघून जातो. अशा प्रकारे तो सारखा फिरत राहिला. याप्रमाणेच हा जीव स्वर्ग, नरक, चौऱ्यांशी लाख योनीत फिरत राहतो. त्या भोग योनीपासून याला सुटका मिळू शकत नाही तेव्हा भगवान् कृपा करून जन्म-मरणाच्या चक्रातून सुटण्यासाठी मनुष्यशरीर देतात. परंतु मनुष्यशरीर मिळाल्यावर त्याच्या मनात भोगाविषयी खाज उत्पन्न होते ज्यामुळे तो परमात्मप्राप्तीकडे न झुकता सांसारिक पदार्थांचा संग्रह करणे आणि त्या पदार्थापासून सुख घेण्यामध्येच मग्न असतो. असे करत करत तो मरतो आणि पुन्हा स्वर्ग, नरक इत्यादी योनींच्या चक्रात सापडतो. अशाप्रकारे वारंवार तो त्या योनीत फिरत राहतो. हेच मृत्युरूपी संसार-सागरात परतणे आहे.

हा जीव साक्षात् परमात्म्याचा अंश आहे म्हणून परमात्माच ह्या जीवाचे मूळ घर आहे. जर हा जीव त्या परमात्म्याची प्राप्ती करून घेईल तर तो आपल्या मूळ स्थानाला (घर) प्राप्त होईल. मग तेथून त्याला परतावे लागत नाही अर्थात् गुणांना परवश होऊन जन्म घ्यावा लागत नाही. ही गोष्ट गीतेत ठिक-ठिकाणी सांगितली आहे—''**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन**'' (४।९) ''**गच्छन्त्यपुनरावृत्तिम्**'' (५।१७) ''**यं प्राप्य न निवर्तन्ते**'' (८।२१) ''**यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः**''(१५।४),''**यद्गत्वा न निवर्तन्ते**''(१५।६) इत्यादी इत्यादी. श्रुती देखील म्हणते-''**न च पुनरावर्तते न च पुनरावर्तते**'' छान्दोग्य (४।१५।१)

## विशेष गोष्ट

बहुतेक लोकांच्या मनात ही गोष्ट पक्की ठसली आहे की, आपण संसारी आहोत, जन्मणारे-मरणारे आहोत, इथेच राहणारे इत्यादी. परंतु ही गोष्ट सर्व खोटी आहे. कारण आपण सर्व परमात्म्याचे अंश आहोत, परमात्म्याच्या जातीचे आहोत परमात्म्याचे साथी आहोत आणि परमात्म्याच्या धामाचे निवासी आहोत. आपण या संसारात आलो आहोत, आपण संसाराचे नाहीत. कारण संसाराचे सर्व पदार्थ जड आहेत. परिवर्तनशील आहेत परंतु आपण स्वतः चेतन आहोत आणि आपल्यात (स्वमध्ये) कधी परिवर्तन होत नाही. अनेक जन्म झाले तरी आपण स्वतः नित्य निरंतर तेच राहतो ''**भूतग्रामः स एवायम्**'' (८।१९) आणि जसेच्या तसे राहतो.

संसाराशी आपला संयोग आणि परमात्म्याशी आपला वियोग कधी होऊच शकत नाही. आपण मग स्वर्गात जा की नरकात जा, अथवा चौऱ्यांशी लाख योनीत जा अथवा मनुष्ययोनीत जा, तरीही आपला परमात्म्याशी वियोग होत नाही. परमात्म्याशी आपला संबंध सुटत नाही. परमात्मा सर्व योनीत आपल्याबरोबर राहतात. परंतु मनुष्येतर योनीत विवेकाची जागृती न राहिल्याने आपण परमात्म्याला ओळखू शकत नाही. परमात्म्याला ओळखून घेण्याची संधी या मनुष्य-शरीरातच आहे. कारण भगवंतांनी कृपा करून या मनुष्याला अशी शक्ती, योग्यता दिली आहे, की त्या आधारे तो सत्संग, विचार, स्वाध्याय, इत्यादीद्वारा विवेक जागृत करून परमात्म्याला जाणून घेऊ शकतो, परमात्म्याची प्राप्ती करू शकतो. म्हणून भगवान् येथे म्हणतात की, या प्राण्यांना मनुष्यशरीर प्राप्त झाले आहे. तर यांनी मला प्राप्त करून घ्यायलाच पाहिजे आणि ''आपण भगवंताचेच आहोत तसेच भगवंतच आपले आहेत.'' ही गोष्ट त्यांच्या लक्षात यायला पाहिजे. परंतु हे ह्या गोष्टीला समजून न घेता माझ्यावर श्रद्धा विश्वास न ठेवता, मला प्राप्त करून न घेता, संसाररूपी मृत्यूच्या मार्गात वाटचाल करीत आहेत—ही फारच दुःखाची आणि आश्चर्याची गोष्ट आहे.

संसारात येणे, चौऱ्यांशी लाख योनीत भटकणे आपले काम नव्हे.हे देश, गाव, कुटुंब, धन, पदार्थ, शरीर, इत्यादी आपले नाहीत आणि आपण त्यांचे नाहीत. हे देश इत्यादी अपरा प्रकृती आहे आणि आपण परा प्रकृती आहोत. परंतु अज्ञानाने आपण आपल्याला येथील राहणारा मानून घेतले. हे अज्ञान नाहीसे केले पाहिजे कारण आपण भगवंताचे अंश आहोत, भगवंताच्या धामाचे आहोत. जेथून परत यावे लागत नाही तेथे जाणे आपले मुख्य कर्तव्य आहे. जन्म-मरणरहित होणे आपले काम आहे. परंतु आपल्या घरी जाण्याला, स्वतःच्या वस्तूला कठीण समजले, प्रयत्नसाध्य मानले वास्तविक हे कठीण नाही. कठीण तर संसाराचा मार्ग आहे; कारण यात मार्ग नव्याने

धरावा लागतो, नवीन शरीर धारण करावे लागते, नवीन कर्म करावी लागतात आणि कर्माचे फल भोगण्यासाठी नवीन नवीन लोकांत नवीन नवीन योनीत जावे लागते. भगवंताची प्राप्ती तर सुगम आहे कारण भगवान् सर्व देशात आहेत, सर्व काळात आहेत, सर्व वस्तूत आहेत, सर्व व्यक्तीत आहेत, सर्व घटनेमध्ये आहेत, सर्व परिस्थितीत आहेत आणि सर्व भगवंतामध्ये आहेत. आपण नित्य भगवंताबरोबर आहोत आणि भगवान् नित्य आपल्याबरोबर आहेत. आपण भगवंतापासून आणि भगवंत आपल्यापासून कधी वेगळे होऊच शकत नाहीत.

तात्पर्य आपण येथील, जन्म-मृत्यू असणाऱ्या संसाराचे नाहीत. हा आपला देश नाही आपण या देशाचे नाहीत. येथील वस्तू आपल्या नाहीत आपण या वस्तूंचे नाहीत. आपले हे कुटुंबीय नाहीत आणि आपण या कुटुंबाचे नाहीत. आपण तर केवळ भगवंताचे आहोत आणि भगवंतच आपले आहेत.

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात सांगितलेल्या विज्ञानासहित ज्ञानाच्या माहात्म्यावर श्रद्धा ठेवणारी माणसे त्यापासून लाभ घेत नाहीत तर नाशवान भोगांना महत्त्व देऊन त्यातच लागून राहतात. म्हणून ते भगवंताला प्राप्त न होता वारंवार जन्मत-मरत राहतात. सहज प्राप्त असलेला अमरतेचा रस्ता सोडून मृत्यूच्या मार्गावर चालत राहतात.

'**अप्राप्य माम्**'—हे म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, मनुष्य शरीरात भगवत्प्राप्तीचा अवसर प्राप्त झाला होता. मनुष्य भगवत्प्राप्तीच्या अगदी जवळ आला होता. परंतु श्रद्धा नसल्यामुळे तो भगवंताला प्राप्त न करून संसारातच फिरत राहतो. जे नित्य विद्यमान आहे त्याला न मानता तो, जे एक क्षणही टिकत नाही त्याला मानतो. त्याचे अंतःकरण इतके अशुद्ध असते की, भगवंताचा प्रत्यक्ष प्रभाव पाहूनही त्यावर श्रद्धा ठेवत नाही. जसे—सत्संग, कीर्तन इत्यादीत प्रत्यक्ष लाभ पाहून ही तो त्यात विशेषतेने लागत नाही. कोण्या प्रिय व्यक्तीचा मृत्यू झाल्यावर अथवा इतर कोणती घटना घडल्यावर त्याला संसारापासून वैराग्य निर्माण होते, तरीही तो त्याच्यात स्थिर राहत नाही. अश्विन कृष्ण १२, संवत २०५२ (दिनांक २९-९-९५) या दिवशी सर्व भूमंडलावर गणेशजीच्या मूर्तिद्वारा दूध प्राशनाची प्रत्यक्ष घटना लोकांच्या पाहण्यात आली. परंतु स्वतःला बुद्धिमान समजणाऱ्या कित्येक लोकांनी अशा प्रत्यक्ष घटनेवरही श्रद्धा केली नाही आणि वर्तमानपत्र, टेलिव्हीजन इत्यादीच्या माध्यमाने याचे खंडन केले. कौरवांच्या सभेतही जेव्हा द्रौपदी वस्त्र-हरणाचा प्रयत्न केला गेला तेव्हा साड्यांचा ढीग झाला परंतु दुःशासन द्रौपदीला किंचिन्मात्रही नग्न करू शकला नाही. एवढा मोठा चमत्कार प्रत्यक्ष पाहूनही कौरव सावध झाले नाहीत! म्हणून ज्यांची बुद्धी तामसी आहे, अशुद्ध आहे, त्यांच्यावर अशा विलक्षण घटनेचा परिणाम होत नाही, त्यांची श्रद्धा बसत नाही. त्यांना सर्व उलटेच उलटे दिसत असते. अशी अश्रद्धाळू माणसे अमरतेच्या मार्गाचा त्याग करून मृत्यूच्या मार्गात वाहत जातात, ज्यात केवळ मृत्यूच मृत्यू असतो. ते अशा मार्गाला पकडतात ज्या मार्गाने कधी भगवंताची प्राप्ती होऊ शकत नाही.

अपराला पकडल्यानेच मनुष्य मृत्यूच्या मार्गाने जातो. जर त्याने अपराला पकडले नाही आणि ज्याची अपरा आहे त्या भगवंताला पकडले तर नेहमीसाठी जन्म-मरणापासून मुक्त होईल! मनुष्य याच जन्मात मुक्त होऊ शकतो आणि मुक्तीपेक्षाही श्रेष्ठ असणारे भगवंताचे प्रेम (भक्ती) प्राप्त करू शकतो. परंतु भगवंताकडून एवढी मोठी योग्यता, पात्रता, अधिकार मिळवूनही तो मृत्यूच्या मार्गाने जातो! म्हणून भगवन् मोठ्या दुःखाने म्हणतात—'**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि**'! आणि '**माम प्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्**' (गीता १६।२०) यावरुन सिद्ध होते की, आता कल्याण प्राप्तीचा फार मोठा सुंदर अवसर आहे. मनुष्य स्वतः स्वतःच्या कल्याणात लागला तर त्यात धर्म, ग्रंथ, महात्मा, संसार, भगवान् सर्वजण साहाय्यता करतात!

***संबंध***—*या अध्यायाच्या पहिल्या आणि दुसऱ्या श्लोकांत ज्या राजविद्येचे माहात्म्य सांगितले गेले आहे त्याचेच वर्णन आता पुढील दोन श्लोकांत करत आहेत.*

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः॥४॥**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः॥५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| इदम् | = हा | **मया** | = माझ्या | **सर्वभूतानि** | = संपूर्ण प्राणी |
| **सर्वम्** | = सर्व | **अव्यक्तमूर्तिना** | = निराकार स्वरूपाने | **मत्स्थानि** | = माझ्यात स्थित आहेत. |
| जगत् | = संसार | **ततम्** | = व्याप्त आहे. | **च** | = परंतु |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **अहम्** | = | मी | **मे** | = | माझ्या (ह्या) | **भूतभृत्** | = | प्राण्यांचे धारण, भरण-पोषण करणारे (असे) |
| **तेषु** | = | त्यांच्यात | **ऐश्वरम्** | = | ईश्वरसंबंधी | | | |
| **न, अवस्थितः** | = | स्थित नाही | **योगम्** | = | योगाला (सामर्थ्याला) | | | |
| **च** | = | आणि | **पश्य** | = | पहा. | **मम** | = | माझे |
| **भूतानि** | = | (ते) प्राणी (ही) | **भूतभावनः** | = | संपूर्ण प्राण्यांना उत्पन्न करणारे | **आत्मा** | = | स्वरूप |
| **मत्स्थानि** | = | माझ्यात स्थित | | | | **भूतस्थः** | = | त्या प्राण्यांमध्ये स्थित |
| **न** | = | नाहीत— | **च** | = | आणि | **न** | = | नाही. |

*व्याख्या*—**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**—मन, बुद्धी. इंद्रियांने ज्याचे ज्ञान होत असते ते भगवंताचे व्यक्तरूप असते आणि जे मन, बुद्धी, इंद्रियांचा विषय नाही अर्थात् मन इत्यादी ज्यांना जाणून घेऊ शकत नाहीत ते भगवंताचे अव्यक्तरूप आहे. या ठिकाणी भगवंतांनी ''**मया**'' पदाने व्यक्त (साकार) स्वरूप आणि ''**अव्यक्त-मूर्तिना**'' पदाने अव्यक्त (निराकर) स्वरूप सांगितले आहे. याचे तात्पर्य भगवान् व्यक्तरूपानेही असतात आणि अव्यक्तरूपानेही असतात. अशाप्रकारे भगवंताची या ठिकाणी व्यक्त-अव्यक्त (साकार-निराकार) म्हणण्याची गूढाभिसंधी समग्ररूपाशी आहे अर्थात् सगुण-निर्गुण, साकार-निराकर, इत्यादीचा भेद तर संप्रदायानुसार असतो. वास्तविक परमात्मा एकच आहे. हे सगुण-निर्गुण इत्यादी एकाच परमात्म्याची वेगवेगळी नावे आहेत.

गीतेत जेथे सत्-असत्, शरीर-शरीरीचे वर्णन केले गेले आहे तेथे जीवाच्या वास्तविक स्वरूपासाठी आलेले आहे ''**येन सर्वमिदं ततम्**'' (२।१७) कारण हा परमात्म्याचा साक्षात अंश असल्याने परमात्म्या सारखाच सर्वत्र व्यापक आहे अर्थात् परमात्म्याशी याचा अभेद आहे. जेथे सगुण-निराकाराच्या उपासनेचे वर्णन आलेले आहे, तेथे म्हटले आहे, ''**येन सर्वमिदं ततम्**'' (८।२२)ज्या ठिकाणी कर्माद्वारा भगवंताचे पूजन सांगितले आहे तेथेही म्हटले आहे, ''**येन सर्वमिदं ततम्**'' (१८।४६). या सर्वांशी ऐक्य करण्यासाठीच भगवान् येथे म्हणतात ''**मया ततमिदं सर्वम्**''

**मत्स्थानि सर्वभूतानि**—संपूर्ण प्राणी माझ्यात स्थित आहेत अर्थात् परा-अपरा प्रकृतिरूपी सर्व जगत् माझ्यातच स्थित असते. ते मला सोडून राहूच शकत नाही. कारण संपूर्ण प्राणी माझ्यापासूनच उत्पन्न होतात, माझ्यातच स्थित राहतात आणि माझ्यातच लीन होतात, अर्थात् त्यांचे उत्पत्ती, स्थिती आणि प्रलयरूपी जे काही परिवर्तन होत असते ते सर्व माझ्यातच होत असते. म्हणून ते सर्व प्राणी माझ्यात स्थित असतात.

**न चाहं तेष्ववस्थितः**—पूर्वी भगवंतांनी दोन गोष्टी सांगितल्या—पहिली ''**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**'' आणि दुसरी ''**मत्स्थानि सर्वभूतानि**'' आता भगवान् या दोन्ही गोष्टींच्या विरुद्ध दोन गोष्टी सांगतात.

पहिली गोष्ट—(मी संपूर्ण जगतात स्थित आहे) च्या विरुद्ध येथे म्हणत आहेत की, मी त्यांच्यात स्थित नसतो. कारण जर मी त्यांच्यात स्थित असतो, तर त्यांचे ठिकाणी जे परिवर्तन होत असते, ते परिवर्तन माझ्यातही झाले असते, त्यांचा नाश झाला तर माझाही नाश झाला असता आणि त्यांचा अभाव झाला तर माझाही अभाव झाला असता. तात्पर्य त्यांच्यात तर परिवर्तन, नाश, अभाव होत असतो, परंतु माझ्यात कधी किंचित्मात्र विकृती होत नाही. मी त्यांच्यात सर्व प्रकाराने व्याप्त राहत असूनही त्यांच्यापासून निर्लिप्त असतो, त्यांच्याशी संपूर्णपणे संबंधरहित असतो. मी तर निर्विकाररूपाने स्वतः आपल्यातच स्थित असतो.

वास्तविक ''मी त्यांच्यात स्थित असतो'' असे म्हणण्याचे तात्पर्य माझ्या सत्तेनेच त्यांची सत्ता असते. माझ्या आस्तित्वामुळेच त्यांचे अस्तित्व असते. जर मी त्यांच्यात नसतो तर जगताला सत्ताच राहिली नसती. जगताचे अस्तित्व तर माझ्या सत्तेनेच दिसते. म्हणून म्हटले की, मी त्यांच्यात स्थित आहे.

**न च मत्स्थानि भूतानि** *—आता भगवान् दुसरी गोष्ट (संपूर्ण प्राणी माझ्यात स्थित आहेत) या विरुद्ध येथे म्हणतात की, ते प्राणी माझ्यात स्थित नाहीत. कारण जर ते प्राणी माझ्यात स्थित असते तर मी जसा निरंतर निर्विकार रूपाने जसाच्या तसा राहतो तसा संसारही निर्विकाररूपाने जसाच्या तसा राहिला असता. माझा कधी उत्पत्ति-विनाश होत नाही तसा संसाराचाही उत्पत्ति-विनाश झाला नसता. एका देशात आहे आणि एका देशात नाही, एका काळात आहे एका काळात

* ''न च मत्स्थानि भूतानि'' चा दुसरा भाव असाही आहे की, ते प्राणी आपल्याला माझ्यात स्थित मानत नाहीत तर आपल्याला प्रकृतीत स्थित मानतात. म्हणून ते माझ्यामध्ये स्थित नाहीत.

नाही, एका व्यक्तीत आहे एका व्यक्तीत नाही, अशी परिच्छिन्नता माझ्यात नसते तर संसारातही अशी परिच्छिन्नता राहिली नसती. तात्पर्य, निर्विकारता, नित्यता, व्यापकता, अविनाशीपणा इत्यादी जसे माझ्यात आहेत तसेच त्या प्राण्यातही राहिले असते. परंतु अशी गोष्ट नाही. माझी स्थिती निरंतर राहते आणि त्यांची स्थिती निरंतर राहत नाही; म्हणून हे सिद्ध झाले की, ते माझ्यात स्थित नाहीत.

आता उपर्युक्त विधीपरक आणि निषेधपरक चारी गोष्टीना दुसऱ्या रीतीने अशा प्रकारे समजून घेऊ. संसारात परमात्मा आहेत आणि परमात्म्यात संसार आहे. तसेच परमात्मा संसारात नाहीत आणि संसार परमात्म्यात नाही. जसे जर लाटांची सत्ता मानली तर लाटात जल आहे आणि जलात लाट आहे. कारण पाण्याला सोडून लाट राहूच शकत नाही. लाट पाण्यापासूनच उत्पन्न होते आणि पाण्यातच राहते आणि पाण्यातच लीन होते. म्हणून लाटेचा आधार, आश्रय केवळ पाणीच आहे. पाण्याशिवाय दुसरी त्याची स्वतंत्र सत्ता नसते. म्हणून लाटेत पाणी आहे आणि पाण्यात लाट आहे. तसेच जर संसाराची सत्ता मानली गेली तर संसारात परमात्मा आणि परमात्म्यात संसार आहे. कारण परमात्म्याला सोडून संसार राहू शकत नाही. संसार परमात्म्यापासूनच उत्पन्न होतो, परमात्म्यातच राहतो आणि परमात्म्यातच लीन होतो. परमात्म्याशिवाय संसाराची कोणती स्वतंत्र सत्ता नसते. म्हणून संसारात परमात्मा आहेत आणि परमात्म्यात संसार आहे.

जर लाट उत्पन्न आणि नष्ट होणारी असल्याने तसेच पाण्याशिवाय तिची स्वतंत्र सत्ता नसल्याने लाटेची सत्ता मानली गेली नाही तर लाटेत पाणी नाही आणि पाण्यात लाट नाही अर्थात् केवळ पाणीच पाणी आहे आणि पाणीच लाटरूपाने दिसत असते. तसेच संसार उत्पन्न आणि नष्ट होणारा असल्याने तसेच परमात्म्याशिवाय त्याची स्वतंत्र सत्ता नसल्याने संसाराची सत्ता मानली गेली नाही तर संसारात परमात्मा नाहीत आणि परमात्म्यात संसार नाही अर्थात् केवळ परमात्माच परमात्मा आहेत आणि परमात्माच संसाररूपाने दिसत असतात. तात्पर्य हे निघाले की, तत्त्वत: एक पाणीच आहे, लाट नव्हे. तसेच तत्त्वत: एक परमात्माच आहेत, संसार नव्हे—"**वासुदेवः सर्वम्**" (७।१९)

आता कार्य-कारणाच्या दृष्टीने पाहिले तर जसे मातीपासून तयार झालेली जेवढी भांडी आहेत त्यात सर्व मातीच असते. कारण ती मातीपासूनच तयार झालेली आहेत, मातीतच राहतात आणि मातीतच लीन होतात अर्थात् त्याचा आधार मातीच आहे. म्हणून भांड्यात माती आहे आणि मातीत भांडी आहेत. परंतु वास्तविक पाहिले तर भांड्यात माती आणि मातीत भांडी नाहीत. जर भांडयात माती असती तर, भांडी फुटली तर मातीही फुटली असती. परंतु माती फुटत नाही म्हणून माती मातीतच राहिली अर्थात् आपली आपल्यातच स्थित राहिली. तसेच मातीत भांडी असती तर माती जशी कायम राहते तशी भांडी कायम राहिली असती परंतु भांडी कायम राहत नाहीत. म्हणून मातीत भांडी नाहीत. तसेच संसारात परमात्मा आणि परमात्म्यात संसार राहत असतानाही संसारात परमात्मा आणि परमात्म्यात संसार नाही. कारण जर संसारात परमात्मा असते तर संसार समाप्त झाल्यावर परमात्माही समाप्त झाले असते. परंतु परमात्मा समाप्त होत नाहीत. म्हणून संसारात परमात्मा नाहीत. परमात्मा तर स्वत: आपल्यात स्थित असतात. तसेच परमात्म्यात संसार नसतो. जर परमात्म्यात संसार असता तर परमात्मा कायम राहत असल्याने संसारही कायम राहिला असता परंतु संसार कायम राहत नाही. म्हणून परमात्म्यात संसार नाही.

जसे एखाद्याला हरिद्वारचे स्मरण झाले तर त्याला मनात हरिकी पेडी दिसू लागते. मध्यभागी घंटाघर बांधलेले आहे. त्याच्या दोन्ही बाजूनी गंगा वाहत आहे पायऱ्यांवर लोक स्नान करत आहेत. पाण्यात मासे उड्या मारत आहेत. असा सर्वचा सर्व हरिद्वार मनामध्ये असतो. म्हणून हरिद्वार येथील सर्व वस्तू (दगड, पाणी, मनुष्य, मासळी इत्यादी) मनच झाले आहे. परंतु चिंतन सोडले तर मग हरिद्वार राहत नाही, केवळ मनच मन राहते. तसेच परमात्म्याने "**बहु स्यां प्रजायेय**" संकल्प केला, तेव्हा संसार प्रगट झाला. त्या संसाराच्या कणा कणात परमात्माच राहिले आणि संसार परमात्म्यातच राहिला. कारण परमात्माच संसाररूपाने प्रगट झाले आहेत. परंतु जेव्हा परमात्मा संकल्प सोडून देतात, तेव्हा मग संसार राहत नाही केवळ परमात्माच परमात्मा राहतात.

तात्पर्य परमात्मा आहेत आणि संसार आहे या दृष्टीने पाहिले तर संसारात परमात्मा आणि परमात्म्यात संसार आहे. परंतु तत्त्वदृष्टीने पाहिले तर संसारात परमात्मा नाहीत आणि परमात्म्यात संसार नाही. कारण त्या ठिकाणी संसाराची स्वतंत्र सत्ताच नाही. त्या ठिकाणी तर केवळ परमात्माच परमात्मा आहेत. "**वासुदेवः सर्वम्**" हीच जीवन्मुक्तांची, भक्तांची दृष्टि असते.

**पश्य मे योगमैश्वरम्** *—मी संपूर्ण जगात आणि संपूर्ण

* येथे "योग" शब्द "युज् संयमने" धातूपासून बनलेला घेतला गेला आहे. कारण संपूर्ण संसाराचे संयमन भगवंतच करतात. तसे तर यमराज-ही प्राण्यांच्या पाप पुण्यानुसार त्यांचे संयमन करतात परंतु ते तर एका मृत्युलेकाच्या प्राण्यांचेच संयमन करतात. परंतु भगवान् अनंत ब्रह्माण्डाचे तसेच

जग माझ्यात असूनही संपूर्ण जग माझ्यात नाही आणि मी संपूर्ण जगात नाही अर्थात् मी संसारापासून संपूर्णपणे निर्लिप्त आहे, स्वत: आपल्यातच स्थित असतो. माझ्या ह्या ऐश्वर्ययोगाला अर्थात् प्रभावाला (सामर्थ्य) पहा. तात्पर्य मी एकच अनेक-रूपाने दिसत असतो आणि अनेकरूपाने दिसत असूनही मी एकच आहे. म्हणून केवळ मीच मी आहे.

"**पश्य**" या क्रियेचे दोन अर्थ होतात—जाणणे आणि पाहणे. जाणणे बुद्धीने आणि पाहणे डोळ्याने होत असते. भगवंताच्या योगाला (प्रभाव) जाणण्यासंबंधी विषय येथे आला आहे आणि त्याला पाहण्यासंबंधी विषय अकराव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात आला आहे.

**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावन:**—माझे जे स्वरूप आहे ते संपूर्ण प्राण्यांना उत्पन्न करणारे, सर्वांना धारण करणारे, तसेच त्यांचे भरण-पोषण करणारे आहे. परंतु मी त्या प्राण्यांत स्थित नसतो अर्थात् मी त्यांच्या आश्रित नसतो, त्यांच्याशी लिप्त नसतो: याच गोष्टीला भगवंतांनी पंधराव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात म्हटले आहे की, क्षर (जगत्) आणि अक्षर (जीवात्मा) दोन्हीपेक्षा उत्तम पुरुष तर दुसराच आहे. ज्याला "परमात्मा" नावाने म्हटले गेले आहे आणि जो संपूर्ण लोकांना व्यापून सर्वांचे भरण-पोषण करत सर्वांचे शासन करतो.

तात्पर्य जसे मी सर्वांना उत्पन्न करून आणि सर्वांचे भरण-पोषण करूनही त्यांच्या आश्रित नसतो, त्यांच्यापासून संपूर्णपणे निर्लिप्त असतो. तसेच मनुष्याने आपल्या कुटुंब-परिवाराचे भरण-पोषण करताना आणि सर्वांची व्यवस्था, संरक्षण करताना त्यांच्याशी अहंता-ममता करू नये आणि कोणत्याही देश, काल, परिस्थितीत राहत असतानाही आपल्याला त्यांच्या आश्रित मानू नये अर्थात् संपूर्णपणे निर्लिप्त रहावे.

भक्तांच्या समोर जशी कांही परिस्थिती येईल, जी काही घटना घडेल, मनात जे काही संकल्प-विकल्प येतील, त्या सर्वात त्याने भगवंताचीच लीला समजली पाहिजे. भगवंतच केव्हा उत्पत्तीची लीला, कधी स्थितीची लीला आणि कधी संहाराची लीला करत असतात. हे सर्व संसाररूपाने तर भगवंताचेच रूप आहे आणि यात जे परिवर्तन होते ती सर्व भगवंताचीच लीला आहे. अशा प्रकारे भगवान् आणि त्यांच्या लीला पाहत भक्ताने नित्य प्रसन्न राहिले पाहिजे.

## मार्मिक गोष्ट

"सर्व काही परमात्माच आहे." ही गोष्ट खूप सखोल उतरून समजून घेतल्यास साधकाला याचा यथार्थ अनुभव होतो. यथार्थ अनुभव होण्याची कसोटी ही आहे की, जर त्याची एखाद्याने प्रशंसा केली की, "आपला सिद्धांत फार उत्तम आहे" इत्यादी तर त्याला आपण काही विशेष आहोत असे वाटू नये. संसारात कोणी आदर करो अथवा निरादर याचाही काही परिणाम साधकावर होऊ नये. जर कोणी म्हणाले की, "संसार नाही परमात्मा आहे. ही तर आपली केवळ कल्पनाच आहे बाकी काही नाही" तर अशा नास्तिकाच्या उत्तराने (खंडनाने) साधकास मुळीच वाईट वाटावयास नको. अशा वेळी त्या गोष्टीस सिद्ध करण्यासाठी त्याला दृष्टांत आणि प्रमाण देऊन समजून सांगण्याची इच्छाच होऊ नये की, "आमचा असा सिद्धांत आहे, अशी आमची मान्यता आहे, ही गोष्ट आम्ही नीट समजून घेतली आहे." इत्यादी. आपल्या सिद्धांताविरुद्ध कोणी कितीही म्हटले तरीसुद्धा आपल्या सिद्धांतात काही उणीव आहे असे वाटू नये. तसेच कोणतेही (उद्वेगादी) विकार आपल्यात उत्पन्न होऊ नयेत. आपला यथार्थ अनुभव सदा सर्वकाळ स्वाभाविकपणे अटळ आणि अखंडरूपाने असावयास पाहिजे. या विषयात साधकाला कधी विचार करण्याची गरजच वाटू नये.

**परिशिष्ट भाव—'मया ततमिदं सर्वम्'** म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, बर्फात असलेल्या पाण्याप्रमाणे संसारात सत्ता ('आहे')—रूपाने एक सम, शांत, सद्घन, चिद्घन, आनंदघन परमात्मतत्त्व परिपूर्ण आहे. ज्याचा प्रत्येक क्षणाला अभाव होत आहे, त्या संसाराची स्वतंत्र सत्ता नाहीच. अज्ञानामुळे संसारात जी सत्ता भासमान होत आहे तीही परमात्मतत्त्वाच्या सत्तेमुळे भासत आहे. जर सर्वात एक अविभक्त सत्ता ('आहे') हीच परिपूर्ण आहे तर मग त्यात मी, तू, हा आणि तो—हे चार विभाग कसे होऊ शकतात? अहंता आणि ममता कशी होऊ शकते? राग-द्वेष कसे होऊ शकतात? ज्याची सत्ताच नाही, त्याला समाप्त करण्याचा अभ्यासही कसा केला जाऊ शकतो?

भगवंताने '**मत्स्थानि सर्वभूतानि**' यासाठी '**न च मत्स्थानि भूतानि**' पद म्हटले आहे आणि '**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**' यासाठी '**न चाहं तेष्ववस्थित:**' पद म्हटले आहे. जोपर्यंत साधकात हा भाव आहे की, परमात्मा आणि संसार दोन आहेत, तोपर्यंत त्याने समजून घ्यावे की, परमात्म्यात संसार आहे आणि संसारात परमात्मा आहेत (गीता ६।३०).

---

त्यात वेगवेगळ्या नियुक्त केलेल्या यमराजांचेही संयमन करतात. या संयमन करण्याच्या शक्तीचे नावच येथे योग, सामर्थ्य, प्रभाव आहे. हे योग, सामर्थ्य आणि प्रभाव पूर्णरूपाने केवळ भगवंतातच राहत असतात.

परंतु जर दोनचा भाव नसेल तर परमात्म्यातही संसार नाही आणि संसारातही परमात्मा नाहीत.

संसाराला स्वतंत्र सत्ता जीवानेच दिली आहे—**'ययेदं धार्यते जगत्'** (गीता ७।५) संसाराची स्वतंत्र सत्ता अहंता, ममता आणि कामनेमुळेच आहे. म्हणून जोपर्यंत अहंता, ममता आणि कामना आहे तोपर्यंत (साधकाच्या दृष्टीत) परमात्म्यात संसार आहे आणि संसारात परमात्मा आहेत. परंतु अहंता, ममता आणि कामना समाप्त झाल्यावर (सिद्धाच्या दृष्टीत) परमात्म्यातही संसार नाही आणि संसारातही परमात्मा नाहीत अर्थात् परमात्माच परमात्मा आहेत—**'वासुदेवः सर्वम्'**.

परमात्म्यात संसार आहे आणि संसारात परमात्मा आहेत—हे 'ज्ञान' आहे आणि परमात्म्यातही संसार नाही आणि संसारातही परमात्मा नाहीत अर्थात् परमात्म्याशिवाय काही नाही—हे 'विज्ञान' आहे.

श्रीमद्भागवतात आले आहे की, जोपर्यंत साधकाच्या दृष्टीत जगताची स्वतंत्र सत्ता आहे तोपर्यंत त्याने आपल्या आचरणद्वारा प्राण्यांची भगवद्बुद्धीने उपासना करावी.* परंतु जेव्हा त्याच्या दृष्टीत जगताची सत्ता राहत नाही अर्थात् केवळ भगवंतच राहतील, तेव्हा 'सर्व काही भगवान्‌च आहेत' या चिंतनापासूनही उपराम व्हावे.†

**'भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः'**—भगवान् संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती करतात—**'अहं सर्वस्य प्रभवः'** (गीता १०। ८). **'अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः'** (गीता (७। ६). त्या प्राण्यांचे भरण-पोषणसुद्धा भगवान्‌च करतात—**'यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः'** (गीता १५। १७). संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती करून आणि त्यांचे भरण-पोषण करून सुद्धा भगवान् त्यांच्यात लिप्त, आसक्त होत नाहीत, त्यांच्या संबंधित राहत नाहीत. भगवान् त्या प्राण्यांत स्थित नसतात. म्हणून त्या प्राण्यांत आणि पदार्थांत आसक्त झाल्याने भगवंताची प्राप्ती होत नाही.

वास्तविक एका चिन्मय सत्तेशिवाय जडतेची सत्ता नाहीच—**'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः'** (गीता २। १६). जडतेची (संसाराची) सत्ता, महत्ता आणि संबंध केवळ कामने (भोगेच्छे) मुळेच आहे. म्हणून जोपर्यंत सुखाची इच्छा आहे तोपर्यंतच हा संसार आहे.

जे परमात्म्यात संसाराला पाहतात अर्थात् संसाराला परमात्मरूपाने न पाहता संसाररूपाने (जडरूपाने) पाहतात, ते नास्तिक असतात. परंतु जे संसारात परमात्म्याला पाहतात अर्थात् संसाराला संसाररूपाने न पाहता परमात्मरूपाने (चिन्मयरूपाने) पाहतात, ते आस्तिक असतात.

***संबंध***—*आता भगवान् मागील दोन श्लोकात सांगितलेल्या गोष्टींना दृष्टांताने स्पष्ट करतात.*

## यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्।
## तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय॥ ६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यथा** | = जसे | **नित्यम्** | = नेहमीच | **भूतानि** | = प्राणी |
| **सर्वत्रगः** | = सर्व ठिकाणी संचार करणारा | **आकाशस्थितः** | = आकाशात स्थित राहतो | **मत्स्थानि** | = माझ्यातच स्थित राहतात— |
| **महान्** | = महान् | **तथा** | = तसेच | **इति** | = असे |
| **वायुः** | = वायू | **सर्वाणि** | = संपूर्ण | **उपधारय** | = तू मान. |

***व्याख्या***—**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्**—ज्याप्रमाणे सर्व ठिकाणी विचरणारा महान् वायू आकाशात नित्यच स्थित राहत असतो अर्थात् तो केव्हा शांत, केव्हा क्रियाशील असतो आणि केव्हा वादळाच्या रूपाने

* यावत् सर्वेषु भूतेषु मद्भावो नोपजायते।
तावदेवमुपासीत वाङ्मनकायवृत्तिभिः॥ (श्रीमद्भा० ११। २९। १७)

'जोपर्यंत संपूर्ण प्राण्यांमध्ये माझा भाव अर्थात् 'सर्व काही परमात्माच आहे' असा वास्तविक भाव होत नाही, तोपर्यंत अशाप्रकारे मन, वाणी आणि शरीराच्या सर्वच वृत्तींनी (आचरणांनी) माझी उपासना करीत रहावी.'

† सर्वं ब्रह्मात्मकं तस्य विद्ययाऽऽत्मनीषया।
परिपश्यन्नुपरमेत् सर्वतो मुक्तसंशयः॥ (श्रीमद्भा० ११। २९। १८)

'पूर्वोक्त साधन करणाऱ्या भक्ताचा 'सर्व काही परमात्मस्वरूपच आहे' असा निश्चय होतो. मग त्याने या अध्यात्मविद्याद्वारा (ब्रह्मविद्याद्वारा) सर्व प्रकाराने संशयरहित होऊन सर्वत्र परमात्म्याला चांगल्याप्रकारे पाहत उपराम व्हावे अर्थात् 'सर्व काही परमात्माच आहे' असे चिंतनही राहू नये, तर प्रत्यक्ष परमात्माच दिसू लागावा.'

वाहत असतो. परंतु कोणत्याही रूपाने वाहणारा वायू आकाशापासून वेगळा होऊ शकत नाही. तो वायू कुठे शांत असलेला दिसेल, कुठे क्रियाशील असलेला दिसेल, तरीही तो आकाशातच राहत असतो. आकाशाला सोडून तो कुठे राहूच शकत नाही. त्याप्रमाणे तिन्ही लोकांत आणि चौदा भुवनांत फिरणारे स्थावर-जंगम संपूर्ण प्राणी माझ्यातच स्थित राहत असतात—**''तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानि''**।

भगवंतांनी चौथ्या श्लोकापासून सहाव्या श्लोकापर्यंत तीन वेळा ''मत्स्थनि'' श्ब्दाचा प्रयोग केला आहे. याचे तात्पर्य हे संपूर्ण प्राणी माझ्यातच स्थित आहेत. मला सोडून हे कुठे जाऊ शकत नाहीत. ह्या प्राण्यांनी प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीर इत्यादीशी कितीही घनिष्ट संबंध मानून घेतला तरीही, ते प्रकृती आणि तिच्या कार्याशी एक होऊ शकत नाहीत आणि आपणाला माझ्यापासून कितीही वेगळे मानले तरीही ते माझ्यापासून वेगळे होऊ शकत नाहीत.

वायूला आकाशात नित्य स्थित दाखवण्याचे तात्पर्य असे की, वायू आकाशापासून वेगळा होऊच शकत नाही. आकाशापासून वेगळा होण्याची थोडीही शक्ती वायूत नाही. कारण आकाशाशी त्याचा नित्य निरंतर घनिष्ट संबंध अर्थात् अभिन्नता असते. वायू आकाशाचे कार्य आहे आणि कार्याची कारणाशी अभिन्नता असते. कार्य केवळ कार्याच्या दृष्टीने पाहिले असता कारणापासून भिन्न दिसते परंतु कारणापेक्षा कार्याची वेगळी सत्ता नसते. ज्यावेळी कार्य कारणात लीन असते त्यावेळी कार्य कारणात प्राग्भावरूपाने अर्थात् अप्रगट-रूपाने राहत असते. उत्पन्न झाल्यावर कार्य भावरूपाने अर्थात् प्रगटरूपाने राहत असते आणि लीन झाल्यावर कार्य प्रध्वंसाभावरूपाने अर्थात् कारणरूपाने राहत असते. कार्याचा प्रध्वंसाभाव नित्य राहत असतो त्याचा कधी अभाव होत नाही कारण तो कारणरूपच बनून जातो. अशा रीतीने वायू आकाशातूनच उत्पन्न होतो, आकाशतच स्थित राहतो आणि आकाशातच लीन होतो. अर्थात् वायूची स्वतंत्र सत्ता न राहता आकाशच राहते. त्याचप्रमाणे हा जीवात्मा परमात्म्यापासूनच प्रगट होतो, परमात्म्यातच स्थित राहतो आणि परमात्म्यातच लीन होतो अर्थात् जीवात्म्याची स्वतंत्र सत्ता न राहता केवळ परमात्माच राहतो.

ज्याप्रामाणे वायू गतिशील असतो अर्थात् सर्व ठिकाणी वाहतो त्याप्रमाणे हा जीवात्मा गतिशील नसतो परंतु जेव्हा गतिशील प्रकृतीचे कार्य शरीराशी आत्मीयता (मी-माझेपणा) करून घेतो तेव्हा शरीराची गती याला आपली गती वाटू लागते. गतिशीलता दिसत असूनही हा निरंतर परमात्म्यातच स्थित राहत असतो. म्हणून दुसऱ्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकात भगवंतांनी जीवात्म्याला नित्य, सर्वगत, अचल, स्थाणू आणि सनातन म्हटले आहे. येथे शरीराच्या गतिशीलतेमुळे याला ''सर्वगत'' म्हटले आहे. अर्थात् हा सर्व ठिकाणी विचरणारा दिसत असूनही अचल आणि स्थाणू आहे. हा स्थिर स्वभावाचा आहे. यात हलण्या डुलण्याची क्रिया नसते. म्हणून भगवान् येथे म्हणत आहेत की, सर्व प्राणी अटळरूपाने नित्य निरंतर माझ्यातच स्थित असतात.

तात्पर्य तिन्ही लोक आणि चौदा भुवनात फिरणाऱ्या जीवांची किंचित्मात्रही भिन्न स्वतंत्र सत्ता नसते आणि असूही शकत नाही अर्थात् सर्व योनीत फिरत राहत असूनही ते नित्य निरंतर परमात्म्याच्या सच्चिदानंदघन स्वरूपातच स्थित राहतात. परंतु प्रकृतीच्या कार्याशी त्यांनी आपला संबंध मानून घेतल्याने त्यांना तसा अनुभव येत नाही. जर ही माणसे शरीराशी आपलेपणा ठेवणार नाहीत, मी-माझेपणा करणार नाहीत तर त्यांना असीम आनंदाचा अनुभव येईल.

म्हणून संपूर्ण मनुष्यांना सावध करण्यासाठी येथे भगवान् म्हणतात की, तुम्ही माझ्या ठिकाणी नित्य निरंतर स्थित आहात तर मग माझ्या प्राप्तीत परिश्रम आणि उशीर कशाला लागेल? माझ्यात आपली स्वत:ची स्थिती न मानल्यानेच आणि जाणून न घेतल्यानेच माझ्यापासून दूरत्व प्रतीत होत आहे.

**इति उपधारय**—ही गोष्ट तू विशेषतेने धारण कर, मान की सर्गाचा (सृष्टी) समय असो अथवा प्रलयाचा असो, अनंत ब्रह्मांडाचे संपूर्ण प्राणी संपूर्णपणे माझ्यातच राहतात. माझ्यापासून त्यांची वेगळी स्थिती कधी होऊच शकत नाही. असे दृढतेने मानल्यावर प्रकृतीच्या कार्याशी विमुखता होईल आणि वास्तविक तत्त्वाचा अनुभव होईल.

या वास्तविक तत्त्वाचा अनुभव करण्यासाठी साधकाने दृढतेने असे मानावे की, जे सर्व देश, काल, वस्तू, व्यक्ती इत्यादीत संपूर्णपणे परिपूर्ण आहेत ते परमात्माच माझे आहेत. देश, काल, वस्तू, व्यक्ती इत्यादी कोणीही माझे नाहीत आणि मी त्यांचा नाही.

## विशेष गोष्ट

संपूर्ण जीव भगवंतातच स्थित राहतात. भगवंतात स्थित राहूनही जीवाच्या शरीरांची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय यांचा क्रम चालू राहतो. कारण सर्व शरीरे परिवर्तनशील आहेत आणि हा जीव स्वत: अपरिवर्तन शील आहे. ह्या जीवाची परमात्म्याशी तात्त्विक एकता आहे. परंतु जेव्हा हा जीव परमात्म्याशी विमुख होऊन शरीराशी आपली एकता

मानतो तेव्हा याला "मी" पणाच्या स्वतंत्र सत्तेचे भान होऊ लागते की, "मी शरीर आहे" या "मी" पणात एक परमात्म्याचा अंश आहे आणि एक प्रकृतीचा अंश आहे. हे जीवाचे स्वरूप झाले. जीव अंश तर आहे परमात्म्याचा, परंतु प्रकृतीच्या अंशाशी आपला संबंध जोडतो.

या "मी" पणात जो प्रकृतीचा अंश आहे तोच स्वतः प्रकृतीकडे ओढला जातो. परंतु प्रकृतीच्या अंशाशी तादात्म्य असल्याने, परमात्म्याचा अंश जीव त्या आकर्षणाला आपले आकर्षण समजतो आणि "मला सुख मिळावे, धन मिळावे, भोग मिळावे" असा भाव करून घेतो. अशी भावना केल्याने तो परमात्म्यापासून विशेष विमुख होतो. त्याचे ठिकाणी "संसाराचे सुख नित्य मिळावे, पदार्थांचा संयोग निरंतर रहावा, हे शरीर माझ्याबरोबर आणि मी शरीराबरोबर सदा असावे" अशी जी इच्छा राहते, ही इच्छा वास्तविक परमात्म्याच्या बरोबर राहण्याची असते, कारण त्याचा नित्य संबंध तर परमात्म्याशीच आहे.

जीव शरीराशी कितीही एकरूप झाला तरी परमात्म्याविषयीचे त्याचे आकर्षण कधी नाहीसे होत नाही, नाहीसे होण्याची शक्यताही नाही "मी नित्य-निरंतर रहावे, सर्वकाळ रहावे, सदा सुखी रहावे, तसेच मला सर्वोपरी सुख मिळावे" या रूपात त्याचे परमात्म्याविषयी आकर्षण राहतेच. परंतु त्याचेकडून ही चूक होत असते की, तो (जड अंशाच्या प्राधान्याने) या सर्वोपरी सुखाला जडाद्वाराच प्राप्त करण्याची इच्छा करतो. तो अज्ञानाने त्या सुखाची इच्छा करू लागतो, ज्या सुखावर त्याचा अधिकार नसतो. जर तो जागृत होईल, सावधान होईल आणि "भोगात काहीही सुख नाही, आजपर्यंत कोणताही संयोग राहिला नाही, राहणे शक्यही नाही" असे समजून घेईल तर सांसारिक संयोगजन्य सुखाची इच्छा समाप्त होईल आणि वास्तविक सर्वोपरी नित्य राहणाऱ्या सुखाची इच्छा (जी आवश्यक आहे) जागृत होईल. ही आवश्यकता जशी जशी जागृत होईल तशी तशी नाशवान् पदार्थाशी विमुखता होत जाईल. नाशवान् पदार्थाविषयी संपूर्णपणे विमुखता झाल्यावर, "माझी स्थिती तर अनादिकालापासून परमात्म्यातच आहे" याचा अनुभव येईल.

**परिशिष्ट भाव**—जसे वायू आकाशातूनच उत्पन्न होतो, आकाशातच स्थित राहतो आणि आकाशातच विलीन होतो अर्थात् आकाशाला सोडून वायूची स्वतंत्र सत्ता नाहीच, तसेच संपूर्ण प्राणी भगवंतापासूनच उत्पन्न होतात, भगवंतातच स्थित राहतात आणि भगवंतातच लीन होतात अर्थात् भगवंताला सोडून प्राण्यांची स्वतंत्र सत्ता नाहीच—ही गोष्ट साधकाने दृढतेने स्वीकार केली तर त्याला 'सर्व काही भगवंतच आहेत' या वास्तविक तत्त्वाचा अनुभव होईल.

हा श्लोक समजून घेण्यासाठी कार्य-कारणभाव जसा ठीक बसतो तसा विवर्तवाद ठीक बसत नाही. 'विवर्त' चा अर्थ आहे—विरुद्ध आचरण! जे नाही पण दिसते, जसे दोरीवर साप दिसणे—हा विवर्तवाद आहे. विवर्तवादात दोन सत्ता असणे आवश्यक आहे. जसे दोरी आणि त्यावर दिसणारा साप—दोन्हींची वेग वेगळी (व्यावहारिक आणि प्रातिभासिक) सत्ता आहे. परंतु गीतेच्या या श्लोकात आकाश आणि वायूचा दृष्टान्त दिला गेला आहे, ज्या दोन्हींची एकच (व्यावहारिक) सत्ता आहे. तात्पर्य हे आहे की, दोरीवर सापा प्रमाणे आकाशात वायू अध्यस्त नाही अथवा आकाशात वायूची केवळ प्रतीती नाही तर वायू आकाशाचे कार्य आहे. कार्याची कारणाशी अभिन्नता असते अर्थात् कार्य आणि कारणाची एक सत्ता असते. जसे—सोने आणि त्याचे कार्य अलंकार—दोन्हींची एक सत्ता आहे. म्हणून जसे सोने आणि अलंकार—दोन्हीत तत्त्वाच्या दृष्टीने एक सोनेच सोने आहे, तसेच परमात्मा आणि संपूर्ण प्राणी—दोन्हीत तत्त्वाच्या दृष्टीने एक परमात्माच परमात्मा आहे. हीच गोष्ट गीतेने **'वासुदेवः सर्वम्'** (७।१९) आणि **'सदसच्चाहम्'** (९।१९) पदांनी सांगितली आहे, जो गीतेचा खास सिद्धांत आहे. विवर्तवाद सिद्धांत नाही, तर संसारातून सत्यत्वबुद्धी हटविण्याचे एक साधन आहे.

जर वायू स्पंदित असेल तर वायूत आकाश आहे आणि आकाशात वायू आहे. जर वायू स्पंदनरहित असेल तर वायूतही आकाश नाही आणि आकाशातही वायू नाही अर्थात् आकाशच आकाश आहे. दुसऱ्या शब्दात, जोपर्यंत वायूच्या स्वतंत्र सत्तेची मान्यता आहे तोपर्यंत आकाशात वायू आणि वायूत आकाश आहे. परंतु तात्त्विक दृष्टीने पाहिले तर आकशात वायूही नाही आणि वायूत आकाशही नाही अर्थात् आकाशच आकाश आहे. त्याचप्रमाणे तात्त्विक दृष्टीने परमात्म्यात प्राणीही नाहीत आणि प्राण्यांमध्ये परमात्माही नाही अर्थात् परमात्माच परमात्मा आहे (गीता ९।४-५).

या श्लोकात वायूसाठी दोन पदे आली आहेत—**'सर्वत्रगः'** आणि **'महान'**. यावरुन हे समजून घ्यावे की, जीवात्मा सुद्धा संसाराच्या दृष्टीने (प्रकृतीच्या संबंधामुळे) चौऱ्यांशी लक्ष योनी, तीन लोक, चौदा भुवने इत्यादीत भ्रमण करीत असल्यामुळे **'सर्वत्रगः'** आहे. **'महान्'** पदाने अनंत ब्रह्मांडाचे सर्वच जीव (जीवसमुदाय) समजावेत. जसा वायू आकाशात नित्यच स्थित राहतो अर्थात् वायूचा आकाशाची नित्यसंबंध आहे, तसेच सर्व जीवांचा परमात्म्याशी नित्यसंबंध (नित्ययोग) आहे.

*संबंध—पूर्व श्लोकात भगवंतांनी संपूर्ण प्राण्यांची स्थिती आपल्या ठिकाणी असल्याचे सांगितले परंतु त्यांच्या महासर्ग आणि महाप्रलयाचे वर्णन करणे बाकी राहिले. म्हणून त्याचे वर्णन पुढील दोन श्लोकांत करत आहेत.*

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम्।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्॥ ७॥**

**कौन्तेय** = हे कुन्तीनंदन!
**कल्पक्षये** = कल्पांचा क्षय झाल्यावर (महाप्रलयकाळी)
**सर्व भूतानि** = संपूर्ण प्राणी
**मामिकाम्** = माझ्या
**प्रकृतिम्** = प्रकृतीला
**यान्ति** = प्राप्त होतात (आणि)
**कल्पादौ** = कल्पाच्या आरंभी (महासर्गकाळी)
**अहम्** = मी
**पुनः** = पुन्हा
**तानि** = त्यांची
**विसृजामि** = रचना करतो

*व्याख्या*— **सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकां कल्पक्षये**—संपूर्ण प्राणी माझेच अंश आहेत आणि नेहमी माझ्यातच स्थित राहणारे आहेत. परंतु ते प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीर इत्यादीशी तादात्म्य (मी माझेपणाचा संबंध) करून जे काही कर्म करतात, त्या कर्माशी तसेच त्यांच्या फलाशी त्यांचा संबंध जडला जातो. ज्यामुळे ते वारंवार जन्मत-मरत राहतात. जेव्हा महाप्रलयाचा काळ येतो (ज्यात ब्रह्मदेव शंभर वर्षाचे आयुष्य पूर्ण झाल्याने लीन होतात) त्यावेळी प्रकृतीला परवश होऊन ते संपूर्ण प्राणी प्रकृतिजन्य संबंधानुसार अर्थात् आपापल्या कर्मानुसार माझ्या प्रकृतीत लीन होतात.

महासर्गाचे वेळी प्राण्यांचा जो स्वभाव असतो त्या स्वभावासहित ते प्रलयात लीन होतात.

**पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्**—महाप्रलयाच्या समयी आपापल्या कर्मानुसार प्रकृतीत लीन झालेल्या प्राण्यांची कर्म जेव्हा परिपक्व होऊन फल देण्यासाठी उन्मुख होतात, तेव्हा भगवंताच्या मनात "**बहु स्यां प्रजायेय**" असा संकल्प होतो. हाच महासर्गाचा आरंभ आहे. यालाच आठव्या अध्यायात तीसऱ्या श्लोकात म्हटले आहे "**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः**" अर्थात् संपूर्ण प्राण्यांचे जे अस्तित्व आहे त्याला प्रगट करण्यासाठी भगवंताचा जो संकल्प आहे हाच विसर्ग (त्याग) आहे आणि हेच आदि कर्म आहे. चौदाव्या अध्यायात यालाच "**गर्भं दधाम्यहम्**" (१४।३) आणि "**अहं बीजप्रदः पिता**" (१४।४) म्हटले आहे.

तात्पर्य कल्पाच्या आरंभी अर्थात् महासर्गाच्या आरंभी, ब्रह्मदेव प्रगट झाल्यावर मी पुन्हा प्रकृतीत लीन झालेल्या, प्रकृतीला वश झालेल्या त्या जीवांचा त्यांच्या कर्मानुसार त्या त्या योनी (शरीर) शी विशेष संबंध करवून देतो—हे माझे त्यांची रचना करणे आहे. यालाच भगवंतांनी चौथ्या अध्यायाच्या तेराव्या श्लोकात म्हटले आहे. "**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः**" अर्थात् माझ्याद्वारा गुण आणि कर्माच्या विभागपूर्वक चारी वर्णांची रचना केली गेली आहे.

ब्रह्मदेवाच्या एका दिवसाचे नाव "कल्प" आहे जे मानवीय एक हजार चतुर्युगी चे असते. इतक्याच समयाची त्यांची रात्र असते. या हिशोबाने ब्रह्मदेवाचे आयुष्य शंभर वर्षाचे असते. ब्रह्मदेवाचे आयुष्य संपल्यावर जेव्हा ब्रह्मदेव लीन होतात त्या महाप्रलयाला येथे "**कल्पक्षये**" पदाने म्हटले गेले आहे. जेव्हा ब्रह्मदेव पुन्हा प्रगट होतात त्या महासर्गाला येथे "**कल्पादौ**" पदाने म्हटले गेले आहे.

येथे "सर्वभूतानि प्रकृतिं यान्ति" महाप्रलयात तर जीव स्वतः प्रकृतीला प्राप्त होतात आणि "**तानि कल्पादौ विसृजामि**" महासर्गाच्या आरंभी मी त्यांची रचना करतो. ह्या दोन प्रकारच्या क्रिया देण्याचे तात्पर्य, प्रकृती क्रियाशील असल्याने आपोआप लयाकडे जात असते अर्थात् क्रिया करता करता थकावट येत असते तेव्हा प्रकृती परमात्म्यात लीन होते. अशा प्रकृतीशी संबंध ठेवल्याने महाप्रळयाचे वेळी प्राणीही आपोआप प्रकृतीत लीन होतात आणि प्रकृती परमात्म्यात लीन होते. महासर्गाच्या आरंभी त्यांच्या परिपक्व कर्माचे फल देऊन त्यांना शुद्ध करण्यासाठी त्यांच्या शरीरांची रचना मी करत असतो. रचना त्याच प्राण्यांची करतो, जे प्रकृतीला परवश झाले आहेत. जसे घर बांधले जाते परंतु ते हळू-हळू आपोआप पडून जाते. तसेच सृष्टीची रचना तर भगवान् करतात, परंतु प्रलय आपोआप होत असतो. यावरुन सिद्ध झाले की, प्रकृतीचे कार्य (संसार-शरीर) रचण्यात तर भगवंताचा हात असतो परंतु प्रकृतीचे कार्य, नाशाकडे आपोआप जात असते. तसेच भगवंताचा अंश असल्याने जीव आपोआप भगवंताकडे, उत्थानाकडे जातो. परंतु जेव्हा हा कामना, ममता आणि आसक्ती करून स्वतः पतनाकडे (नाशाकडे) जाणाऱ्या नाशवान् शरीर-संसाराशी आपला संबंध मानून

घेतो तेव्हा तो पतनाकडे जातो. म्हणून मनुष्याने आपल्या विवेकाला महत्त्व देऊन तत्परतेने आपले व्युत्थान करून घ्यावे. अर्थात् कामना, ममता, आसक्तीचा त्याग करून केवळ भगवंतालाच सम्मुख झाले पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—सृष्टीत तीन गोष्टी मुख्य आहेत—उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय. साधकाची दृष्टी संसाराच्या स्थितीकडेच राहते. म्हणून प्रथम पूर्व श्लोकात स्थितीचा विषय सांगून आता भगवान् या श्लोकात उत्पत्ती आणि प्रलयाचा विषय सांगत आहेत. तात्पर्य हे आहे की, उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय—तिन्हीही समग्र परमात्म्यापासून होतात.

वास्तविक संसाराची स्थिती नाहीच तर उत्पत्ती आणि प्रलय यांच्या प्रवाहालाच स्थिती म्हणत असतात. तात्त्विक दृष्टीने पाहिले तर संसाराची उत्पत्तीच नाही तर प्रलयच प्रलय अर्थात् अभावच अभाव आहे. म्हणून संसाराचा प्रलय, अभाव अथवा वियोगच मुख्य आहे—'**नासतो विद्यते भावः**' (गीता २। १६)

## प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः।
## भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्॥ ८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रकृतेः** | = प्रकृतीला | **कृत्स्नम्** | = संपूर्ण | **प्रकृतिम्** | = प्रकृतीला |
| **वशात्** | = वश झाल्यामुळे | **भूतग्रामम्** | = प्राणिसमुदायाची (कल्पारंभी) | **अवष्टभ्य** | = वश करून |
| **अवशम्** | = परतंत्र झालेल्या | | | **पुनः, पुनः** | = वारंवार |
| **इमम्** | = ह्या | **स्वाम्** | = (मी) आपल्या | **विसृजामि** | = रचना करतो |

*व्याख्या*— **भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्**—येथे ''प्रकृति'' शब्द व्यष्टी प्रकृतीचा वाचक आहे. महाप्रलयकाळी सर्व प्राणी आपल्या व्यष्टी प्रकृतीत (कारणशरीर) लीन होतात. व्यष्टी प्रकृती समष्टी प्रकृतीत लीन होत असते आणि समष्टी प्रकृती परमात्म्यात लीन होते. परंतु जेव्हा महासर्गाचा काळ येतो तेव्हा जीवाची कर्मफल देण्यासाठी उन्मुख होतात. त्या उन्मुखतेमुळे भगवंताच्या ठिकाणी ''**बहु स्यां प्रजायेय**'' (छांदोग्य० ६। २। ३) हा संकल्प होतो ज्यामुळे समष्टी प्रकृतीत क्षोभ (खळबळ) उत्पन्न होतो. जसे दही घुसळले तर त्यात लोणी आणि ताक दोन पदार्थ उत्पन्न होतात. लोणी तर वर येते आणि ताक खाली राहते. येथे लोणी सात्त्विक आहे आणि ताक तामस आहे आणि घुसळण्याची क्रिया राजस आहे. त्याचप्रमाणे भगवंताच्या संकल्पाने प्रकृतीत क्षोभ निर्माण होऊन प्रकृतीपासून सात्त्विक, राजस आणि तामस हे तीन गुण उत्पन्न झाले. या तीन गुणाने स्वर्ग, मृत्यू आणि पाताळ हे तीन लोक उत्पन्न झाले. या तीन लोकातही आपापल्या गुण, कर्म आणि स्वभावाने सात्त्विक, राजस आणि तामस जीव उत्पन्न झाले अर्थात् कोणी सत्त्व-प्रधान आहेत, कोणी रजः प्रधान आहेत आणि कोणी तमः प्रधान आहेत.

याच महासर्गाचे वर्णन चौदाव्या अध्यायाच्या तीसऱ्या, चौथ्या श्लोकांतही केले गेले आहे. तेथे परमात्म्याच्या प्रकृतीला ''महद्ब्रह्म'' म्हटले गेले आहे आणि परमात्म्याचा अंश जीवांच्या आपापल्या गुण, कर्म आणि स्वभावानुसार प्रकृतीशी विशेष संबंध करवून देण्याला, बीज स्थापन करणे म्हटले गेले आहे.

हे जीव महाप्रलयकाळी प्रकृतीत लीन झाले होते त्यावेळी तत्त्वाच्या दृष्टीने प्रकृतीचे कार्य (शरीर-संसार) प्रकृतीत लीन झाले होते आणि परमात्म्याचा अंश-चेतन-समुदाय परमात्म्यात लीन झाला होता. परंतु तो चेतनसमुदाय आपल्या गुण आणि कर्माच्या संस्काराला बरोबर घेऊनच परमात्म्यात लीन झाला होता. म्हणून परमात्म्यात लीन होऊन-ही तो मुक्त झाला नाही. जर त्याने लीन होण्यापूर्वी गुणांचा त्याग केला असता तर परमात्म्यात लीन झाल्यावर नेहमीसाठी मुक्त झाला असता. जन्म-मरणरूपी बंधनातून सुटला असता. त्या गुणांचा त्याग न केल्यानेच त्याचा महासर्गारंभी वेग-वेगळ्या योनींच्या शरीराशी संबंध होतो अर्थात् वेगवेगळ्या योनीत त्याचा जन्म होतो.

या चेतनसमुदायाचे व्यष्टी-प्रकृती अर्थात् गुण, कर्म इत्यादीशी, मानलेल्या स्वभावाची परवशताच वेगवेगळ्या योनीत जन्म होण्यात कारण आहे. आठव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात जी परवशता सांगितली गेली आहे ती देखील व्यष्टी-प्रकृतीची आहे. तीसऱ्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात जी परवशता सांगितली गेली आहे ती जन्म झाल्यानंतरची परवशता आहे. ही परवशता तिन्ही लोकात आहे. याच परवशतेचे चौदाव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात गुणांच्या परवशतेच्या रूपात वर्णन झाले आहे.

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य**—प्रकृती परमात्म्याची एक

अनिर्वचनीय, अलौकिक, विलक्षण शक्ती आहे. हिला परमात्म्यापासून भिन्नही म्हणू शकत नाही आणि अभिन्नही म्हणू शकत नाही. अशा आपल्या प्रकृतीचा स्वीकार करून परमात्मा महासर्गारंभी प्रकृतीला वश झालेल्या जीवांची रचना करतात.

परमात्मा प्रकृतीला अधीन करूनच सृष्टीची रचना करत असतात प्रकृतिविना नव्हे. कारण सृष्टीत जे परिवर्तन होते, उत्पत्ति-विनाश होत असतो, तो सर्व प्रकृतीतच होत असतो, भगवंतात नव्हे. म्हणून भगवान् क्रियाशील प्रकृतीच्या साहाय्यानेच सृष्टीची रचना करतात. यात भगवंताची कोणती असमर्थता, पराधीनता, अभाव अथवा कमजोरी इत्यादी नव्हे.

जसे मनुष्याकडून निरनिराळी कार्य होतात तर ती निरनिराळ्या करण, उपकरण, इंद्रिये आणि वृत्तीने होत असतात. परंतु ही मनुष्याची असमर्थता नाही तर त्याचे या करण, उपकरण इत्यादीवर अधिपत्य असते ज्यामुळे तो त्यांचेकडून कार्य करवून घेतो. (मात्र, मनुष्यात ही उणीव आहे की, तो या कर्मांना आपले आणि आपल्यासाठी समजतो ज्यामुळे तो लिप्त होत असतो अर्थात् मालक असूनही गुलाम होतो) त्याचप्रमाणे भगवंत सृष्टीची रचना करतात तर त्यांचे प्रकृतीवर अधिपत्यच सिद्ध होते. परंतु अधिपत्य असले तरी भगवंताचे ठिकाणी लिप्तता इत्यादी होत नाही.

**विसृजामि पुनः पुनः**—*येथे "**वि**" उपसर्गपूर्वक "**सृजामि**" क्रिया देण्याचे तात्पर्य, भगवंत ज्या जीवांची रचना करतात ते विविध (अनेक प्रकारचे) कर्म असणारेच असतात. म्हणून भगवान् त्यांची विविध प्रकाराने रचना करतात अर्थात् स्थावर-जंगम, स्थूल-सूक्ष्म इत्यादी भौतिक शरीरातही कित्येक पृथ्वीप्रधान, कित्येक तेजप्रधान, कित्येक वायुप्रधान इत्यादी अनेक प्रकारची शरीरे असतात त्या सर्वांची भगवान रचना करतात.

येथे ही गोष्ट समजून घेण्याची आहे की, भगवान् त्याच जीवांची रचना करतात जे व्यष्टी-प्रकृतीशी "मी" आणि "माझे" म्हणून प्रकृतीला वश झालेले आहेत. व्यष्टी-प्रकृतीला परवश झाल्यानेच जीव समष्टी-प्रकृतीच्या परवश होतो. प्रकृतीला परवश न झाल्यास महासर्गात त्याचा जन्म होत नाही.

**परिशिष्ट भाव**—तत्त्वाच्या दृष्टीने प्रकृती भगवंताशी अभिन्न आहे. म्हणून वास्तविक भगवंताचे स्वरूप प्रकृतीसहितच आहे. भगवंताला प्रकृतीरहित मानणे एकदेशीय मानणे आहे, जे संभवतच नाही.

'**अवशं प्रकृतेर्वशात्**'—परा-प्रकृती अर्थात् स्व सर्वथा स्वतंत्र (स्वस्थ) आहे. विजातीय अपरा-प्रकृतीशी संबंध जोडल्यानेच तो परतंत्र (प्रकृतिस्थ) झाला आहे, नाही तर तो परतंत्र होऊ शकत नाही. गुणांचा संग होणे हीच परतंत्रता आहे—'**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**' (१३। २१)

जे प्रकृतीला वश (अवश) आहेत त्याच प्राण्यांची भगवान् वारंवार रचना करतात. जे प्रकृतीला वश (अवश) नाहीत त्यांची रचना होत नाही—'**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च**' (१४। २)

***संबंध**—आसक्ती आणि कर्तृत्वाभिमानपूर्वक कर्म केल्याने मनुष्य कर्मांनी बांधला जातो. भगवान् वारंवार सृष्टीरचनारूपी कर्म करूनही का बांधले जात नाहीत? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

## न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय।
## उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु॥ ९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **धनञ्जय** | = हे धनंजय! | **असक्तम्** | = अनासक्त | **माम्** | = मला |
| **तेषु** | = त्या (सृष्टि-रचना इत्यादी) | **च** | = आणि | **तानि** | = ती |
| | | **उदासीनवत्** | = उदासीना-प्रमाणे | **कर्माणि** | = कर्म |
| | | | | **निबध्नन्ति** | = बंधन-करीत |
| **कर्मसु** | = कर्मात | **आसीनम्** | = राहणाऱ्या | **न** | = नाहीत. |

***व्याख्या**—* **उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु**—महासर्गारंभी प्रकृतीला परवश असलेल्या प्राण्यांचे त्यांच्या कर्मानुसार विविध प्रकाराने रचनारूपी जे कर्म आहे त्यात माझी आसक्ती नसते. कारण मी त्यांच्याविषयी उदासीना-प्रमाणे राहत असतो, अर्थात् प्राण्यांच्या उत्पन्न होण्याने हर्षित होत नाही त्यांच्या प्रकृतीत लीन होण्याने मी खिन्न

* येथे (सहाव्या, सातव्या आणि आठव्या श्लोकात) "विसृजामि" पदाने उत्पत्तीचे, "मत्स्थानि" पदाने स्थितीचे आणि "प्रकृतिं यान्ति मामिकां कल्पक्षये" पदांनी प्रलयाचे वर्णन आले आहे.

होत नाही.

येथे "**उदासीनवत्**" पदात जे "**वत्**" (वति) प्रत्यय आहे त्याचा अर्थ "प्रमाणे" असा होतो म्हणून या पदाचा उदासीनाप्रमाणे असा अर्थ झाला. भगवंतांनी आपणाला उदासीनाप्रमाणे का म्हटले? कारण मनुष्य ज्या वस्तूची सत्ता मानतो त्याच वस्तूविषयी तो उदासीन असतो. परंतु ज्या संसाराची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय होतो त्याची भगवंताशिवाय कोणती स्वतंत्र सत्ताच नाही. म्हणून भगवान् त्या संसाराच्या रचनारूपी कर्मापासून कुठे उदासीन राहिले? ते तर उदासीनाप्रमाणे राहतात. कारण भगवंताच्या दृष्टीत संसाराची कोणती सत्ताच नसते. तात्पर्य वास्तविक हे सर्व भगवंताचेच स्वरूप आहे, यांची स्वतंत्र सत्ता नाहीच, तर मग भगवान् आपल्या स्वरूपाशी कुठे उदासीन राहिले? म्हणून भगवान् उदासीनाप्रमाणे आहेत.

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति**—पूर्वश्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मी प्राण्यांची वारंवार रचना करत असतो. त्या रचनारूपी कर्मालाच येथे "**तानि**" पदाने म्हटले गेले आहे. ते कर्म मला बांधत नाहीत कारण त्या कर्म आणि त्यांच्या फलाशी माझा कोणताही संबंध नसतो. असे म्हणून भगवान् मनुष्यमात्राला असा बोध करतात, कर्मबंधनापासून सुटण्याची युक्ती सांगतात की, जसा मी कर्माविषयी आसक्त नसल्यामुळे बांधला जात नाही तसेच तुम्हीही कर्माविषयी आणि त्यांच्या फलाविषयी आसक्ती ठेवली नाही तर सर्व कर्म करूनही तुम्ही त्यापासून बांधले जाणार नाहीत. जर तुम्ही कर्माविषयी आणि त्यांच्या फलाविषयी आसक्ती ठेवली तर तुम्हाला दुःख भोगावे लागेल, वारंवार जन्मावे-मरावे लागेल. कारण कर्माचा आरंभ आणि अंत होत असतो तसेच फलही उत्पन्न होऊन नष्ट होत असते. परंतु कर्मफलाच्या इच्छेमुळेच मनुष्य बांधला जातो. ही किती आश्चर्याची गोष्ट आहे की, कर्म आणि त्याचे फल तर राहत नाही परंतु (फलेच्छेमुळे) बंधन मात्र राहते. तसेच वस्तू राहत नाही परंतु वस्तूचा संबंध (बंधन) मात्र राहतो. संबंधी राहत नसतो परंतु संबंध मात्र राहत असतो. मूर्खतेची परिसीमा आहे.

**परिशिष्ट भाव**—कर्मांनी मनुष्य बांधला जातो ( **कर्मणा बध्यते जन्तुः** )—या सांसारिक दृष्टीनेच भगवान् म्हणतात की, मी कर्मांनी बांधला जात नाही. (गीता ४। १४). कारण माझ्यात कर्मासक्तीही नाही, फलासक्तीही नाही आणि कर्तृत्वही नाही. परंतु तात्त्विक दृष्टीने पाहिले तर कर्मांची स्वतंत्र सत्ता नाहीच. सृष्टिरचनारूपी कर्म भगवंताचेच स्वरूप आहे—'**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्**' (गीता ७। २९), '**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसञ्ज्ञितः**' (गीता ८। ३). तात्पर्य हे आहे की, सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय इत्यादी जे काही होत आहे. ते सर्व भगवतद्वाराच होत आहे आणि भगवंताचेच स्वरूप आहे. उत्पन्न करणारा आणि उत्पन्न होणारा, पालन करणारा आणि पालित होणारा, नाश करणारा आणि नष्ट होणारा—हे सर्व एकाच समग्र भगवंताचे अंग (स्वरूप) आहे—'**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा**' (गीता ७। ६).

सर्व काही भगवानच आहेत, दुसरे कोणी नाहीच, मग भगवान् कोणाशी उदासीन होतील. म्हणून भगवंताने स्वतःला '**उदासीनवत्**' अर्थात् उदासीनाप्रमाणे म्हटले आहे.

***संबंध**—पूर्वश्लोकात आसक्तीचा निषेध करून आता भगवान् कर्तृत्वाभिमानाचा निषेध करत आहेत.*

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्।**
**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते॥ १०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रकृतिः** | = प्रकृती | | संपूर्ण जगताची | **हेतुना** | = हेतूने |
| **मया** | = माझ्या | **सूयते** | = रचना करते. | **जगत्** | = जगताचे (विविध प्रकाराने) |
| **अध्यक्षेण** | = अध्यक्षतेखाली | **कौन्तेय** | = हे कुन्तीनंदन! | | |
| **सचराचरम्** | = चराचरासहित | **अनेन** | = याच | **विपरिवर्तते** | = परिवर्तन होते. |

***व्याख्या**—* **मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्**—माझ्याकडून सत्ता स्फूर्ती मिळवूनच प्रकृती चर-अचर, जड-चेतन, इत्यादी भौतिक सृष्टीची रचना करते. जसे पाणी गोठून बर्फ बनणे, हीटर जळणे, ट्राम आणि रेल्वे चालणे, लिफ्टचे चढणे-उतरणे, हजारो मैलावरील बोलले जाणारे शब्द ऐकू येणे, हजारो मैला-वरील नाटकादी दृष्य पाहता येणे, शरीराच्या आतील चित्र घेणे, थोड्यावेळात मोठ्यात मोठा हिशोब करता येणे इत्यादी इत्यादी कार्य निरनिराळ्या यंत्राने होतात. परंतु त्या सर्व यंत्रांत शक्ती विजेचीच असते. विजेच्या शक्तिविना हे यंत्र स्वतः काम करूच शकत नाहीत. कारण

त्या यंत्रात विजेला सोडून कोणतेही सामर्थ्य नसते. तसेच संसारामध्ये जे काही परिवर्तन होत आहे अर्थात् अनंत ब्रह्माण्डाचे सृजन, पालन आणि संहार, स्वर्गादी लोकात आणि नरकांत पुण्य-पापाच्या फलाचा भोग, अनेक प्रकारच्या विचित्र परिस्थिती आणि घटना, निरनिराळ्या आकृती, वेशभूषा स्वभाव इत्यादी जे काही होत आहे ते सर्वचे सर्व प्रकृतिद्वाराच होत आहे. परंतु वास्तविक भगवंताच्या अध्यक्षतेखाली अर्थात् सत्ता-स्फूर्तिनेच होत आहे. भगवंताच्या सत्ता-स्फूर्तीविना प्रकृती असे विचित्र काम करूच शकत नाही. कारण भगवंताला सोडून प्रकृतीत असे स्वतंत्र सामर्थ्यच नाही की, ती एकटे कोणते काम करू शकेल. तात्पर्य, जसे विजेत सर्व प्रकारच्या शक्ती असतात परंतु त्या शक्ती मशीनांच्या द्वारेच प्रगट होतात. तसेच भगवंतात अनंत शक्ती आहेत परंतु ते प्रकृतिद्वाराच प्रगट होतात.

भगवान् संसाराची रचना प्रकृतीला अधीन करून करतात आणि प्रकृती संसाराची रचना भगवंताच्या अध्यक्षतेखाली करत असते. ''भगवान् अध्यक्ष आहेत'' याच हेतूने जगताचे विविध परिवर्तन होत असते-''हेतुनानेन जगद्विपरिवर्तते.'' ते विविध परिवर्तन कोणते आहे ? जोपर्यंत प्राण्यांचा प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीराशी ''मी'', आणि ''माझेपणा'' कायम असतो, तोपर्यंत त्यांचे विविध परिवर्तन होतच असते. अर्थात् कधी कोण्या लोकात तर कधी कोण्या लोकात, कधी कोण्या शरीरात तर कधी कोण्या शरीरात, परिवर्तन होतच राहते. तात्पर्य भगवत्प्राप्तीशिवाय त्या प्राण्यांची कधी कोठेही स्थायी स्थिती राहत नाही. ते जन्म-मरणाच्या चक्रामध्ये फिरतच राहतात. (९ । ३)

सर्वच प्राणी भगवंतात स्थित असल्याने भगवंताला प्राप्त आहेत परंतु जेव्हा ते आपल्याला भगवंतात न मानता प्रकृतीत मानतात अर्थात् प्रकृतीच्या कार्याशी ''मी''''आणि'' माझेपणा'' चा संबंध मानतात तेव्हा ते प्रकृतीला प्राप्त होतात. मग भगवंताच्या अध्यक्षतेखाली प्रकृती त्यांच्या शरीराला उत्पन्न आणि लीन करत राहते. वास्तविक पाहिले तर, त्या प्राण्यांना उत्पन्न आणि लीन करण्याची शक्ती प्रकृतीत नाही. कारण ती जड आहे. हा स्व देखील जन्मत-मरत नाही कारण परमात्म्याचा अंश असल्याने स्व अविनाशी आहे, चेतन आहे, निर्विकार आहे. परंतु प्रकृतिजन्य पदार्थांशी मी माझेपणाचा संबंध जोडून त्यांना परवश होऊन याला जन्मावे-मरावे लागते, अर्थात् नवीन-नवीन शरीरे धारण करावी आणि सोडावी लागतात.

संपूर्ण जगताची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय याची जी क्रिया होत असते ती सर्व प्रकृतीपासूनच होत असते. परंतु त्या प्रकृतीला परमात्म्यापासूनच सत्ता-स्फूर्ती मिळत असते, परमात्म्यापासून सत्ता-स्फूर्ती मिळत असूनही परमात्म्यात कर्तृत्व येत नाही. जसे सूर्याच्या प्रकाशात सर्वच प्राणी सर्व क्रिया करत असतात आणि त्यांच्या कर्मात विहित तसेच निषिद्ध सर्व प्रकारच्या क्रिया होत असतात त्या कर्मानुसारच प्राणी अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीचा अनुभव करत असतात. अर्थात् कोणी सुखी आहे तर कोणी दु:खी आहे, कोणी उच्च आहे तर कोणी नीच आहे, कोणी कोण्या लोकात आहे तर कोणी कोण्या लोकात आहे, कोणी कोण्या वर्णाश्रमात आहे तर कोणी कोण्या वर्णाश्रमात आहे इत्यादी अनेक प्रकारचे परिवर्तन होत असते. परंतु सूर्य आणि त्याचा प्रकाश जसाच्या तसाच राहत असतो. त्यात कधी थोडाही फरक येत नाही. तसेच संसारात विविध प्रकारचे परिवर्तन होत आहे परंतु परमात्मा आणि त्यांचा अंश जीवात्मा जसेच्या तसेच राहतात. वास्तविक आपल्या स्वरूपात थोडेही परिवर्तन होत नाही, कधी झाले नाही अथवा पुढे होणार नाही आणि होऊही शकत नाही. केवळ परिवर्तनशील संसाराशी आपला संबंध मानल्याने अर्थात् तादात्म्य, ममता आणि कामना करण्यानेच संसाराचे परिवर्तन आपल्यात होत असलेले प्रतीत होत असते. जर प्राण्याने, ज्या भगवंताच्या अध्यक्षतेखाली सर्व परिवर्तन होत असते, त्यांच्याशी आपले वास्तविक ऐक्य मानले (जे स्वत:सिद्ध आहे) तर भगवंताशी त्याचे जे वास्तविक प्रेम आहे ते आपोआप प्रगट होईल.

**परिशिष्ट भाव**—भगवंताकडून सत्ता-स्फूर्ती मिळवूनच प्रकृती चराचरासहित संपूर्ण प्राण्यांची रचना करते अर्थात् सर्व परिवर्तन प्रकृतीतच होते, भगवंतात नव्हे. जोपर्यंत प्राण्यांचा प्रकृतीशी संबंध राहतो तोपर्यंत प्रकृतीच्या परवशतेमुळे त्यांच्यात वेग-वेगळे परिवर्तन होत राहते अर्थात् त्यांची कोठेही स्थायी स्थिती नसते, तर ते जन्म-मरणाच्या चक्रात भ्रमण करीत राहतात.

प्रकृती तर परमात्म्याच्या अधीन राहून संपूर्ण सृष्टीची रचना करते. परंतु जीव प्रकृतीच्या अधीन होऊन जन्म-मरणाच्या चक्रात भ्रमण करीत राहतो. तात्पर्य हे आहे की, परमात्मा तर स्वतंत्र आहेत परंतु त्यांचा अंश जीवात्मा सुखाच्या इच्छेमुळे परतंत्र होतो.

तत्त्वदृष्ट्या भगवान् (शक्तिमान्) आणि प्रकृती (शक्ती) एक असूनही मनुष्याला समजाविण्याच्या दृष्टीने भगवान् म्हणतात की, सृष्टीच्या रचनेत प्रकृतीचा मुख्य हात आहे. वास्तविक प्रकृतीचीही स्वतंत्र सत्ता नाही आणि कर्मांचीही स्वतंत्र सत्ता नाही.

सातव्या अध्यायाच्या आरंभी भगवंताने परा आणि अपरा प्रकृतीच्या स्वरूपाचे वर्णन केले आहे आणि येथे (नवव्या

अध्यायाच्या आरंभी) त्यांच्या कार्याचे (उत्पत्ती, स्थिती प्रलय यांचे) वर्णन केले आहे, जी भगवंताची लीला आहे. तात्पर्य हे आहे की, सातव्या अध्यायात परा-अपरा यांचे वर्णन मुख्य आहे आणि येथे परा-अपरा यांच्या मालकाचे (परमात्म्याचे) वर्णन मुख्य आहे. या अध्यायात भगवंताची लीला, प्रभाव, ऐश्वर्य यांचे विशद वर्णन आहे, ज्यामुळे साधकाचे भगवंतात प्रेम निर्माण होईल आणि तो मुक्तीत अडकणार नाही.

***संबंध—** जे नित्य निरंतर स्वत: आपल्यात स्थित असतात, ज्याच्या आश्रयाने प्रकृती क्रिया करत आहे आणि संपूर्ण संसाराचे परिवर्तन होत आहे अशा परमात्म्याकडे दृष्टी न टाकता जे उलट चालतात त्यांचे वर्णन पुढील दोन श्लोकांत करतात.*

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥ ११॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मूढाः** | = मूर्खलोक | **परम्, भावम्** | = श्रेष्ठभावाला | **आश्रितम्** | = आश्रित मानून अर्थात् साधारण मनुष्य मानून |
| **मम** | = माझ्या | **अजानन्तः** | = न जाणता | | |
| **भूतमहेश्वरम्** | = संपूर्ण प्राण्यांच्या महान् ईश्वररूप | **माम्** | = मला | **अवजानन्ति** | = (माझी) अवज्ञा करतात. |
| | | **मानुषीम्, तनुम्** | = मनुष्य शरीराच्या | | |

*व्याख्या—* **परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्—** ज्याची सत्ता-स्फूर्ती मिळवून प्रकृती अनंत ब्रह्मांडाची रचना करत असते, चर-अचर, स्थावर-जंगम, प्राण्यांना उत्पन्न करते, जे प्रकृती आणि तिच्या संपूर्ण कार्याचे संचालक, प्रवर्तक, शासक आणि संरक्षक आहेत, ज्याच्या इच्छेशिवाय वृक्षाचे पानही हालत नाही, प्राणी आपल्या कर्मानुसार ज्या ज्या लोकात जातात, त्या त्या लोकात प्राण्यांवर शासन करणाऱ्या जितक्या देवता आहेत त्यांचाही जो ईश्वर (मालक) आहे आणि जो सर्वांना जाणणारा आहे—असा माझा भूतमहेश्वररूपी सर्वोत्कृष्ट भाव (स्वरूप) आहे.

**परं भावम्—**म्हणण्याचे तात्पर्य, माझ्या सर्वोत्कृष्ट प्रभावाला अर्थात् करण्यात, न करण्यात, उलट-सुलट करण्यात जो संपूर्णपणे स्वतंत्र आहे, जो कर्म, क्लेश, विपाक इत्यादी कोणत्या विकाराने कधी आबद्ध नसतो, जो क्षराहून अतीत आणि अक्षराहूनही उत्तम आहे तसेच वेद आणि शास्त्रामध्ये पुरुषोत्तम नावाने प्रसिद्ध आहे (१५। १८) अशा माझ्या परमभावाला मूर्खलोक जाणून घेत नाहीत, म्हणूनच ते मला मनुष्यासारखे समजून माझी अवज्ञा करत असतात.

**मानुषीं तनुमाश्रितम्—**भगवंताला मनुष्य समजणे म्हणजे काय? जसे सामान्य मनुष्य आपल्याला शरीर, कुटुंब-परिवार, धन-संपत्ती, पद-अधिकार, इत्यादीचे आश्रित मानतात अर्थात् शरीर, कुटुंब इत्यादीच्या इज्जत-प्रतिष्ठेला आपली इज्जत-प्रतिष्ठा मानतात, ते पदार्थ मिळाल्यास आपल्याला मोठे समजतात आणि ते न मिळाले तर आपल्याला लहान समजतात आणि जसे सामान्य प्राणी पूर्वी नसतात, मध्यंतरी प्रगट होतात आणि शेवटी पुन्हा अप्रगट होतात (२। २८) तसेच ते मला साधारण मनुष्य समजतात. ते मला मनुष्यशरीराला परवश असणारा मानतात अर्थात् जसे साधारण मनुष्य असतात तसेच साधारण मनुष्य कृष्ण आहेत असे समजतात.

भगवंत शरीराच्या आश्रित नसतात. शरीराच्या आश्रित तर तेच असतात ज्यांना कर्मफल भोगासाठी पूर्वकृत कर्मानुसार शरीर मिळत असते. परंतु भगवंताचे मानवीय शरीर कर्मजन्य नसते. ते आपल्या इच्छेनेच प्रगट होतात **"इच्छयाऽऽत्तवपुषः"** (श्रीमद्भा० १०। ३३। ३५) आणि स्वतंत्रतापूर्वक मत्स्य, कच्छप, वराह इत्यादी अवतार घेतात. म्हणून त्यांना कर्मबंधन होत नसते, ते शरीराच्या आश्रित राहत नाहीत, तर शरीर त्यांच्या आश्रित राहत असते— **"प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवामि"** (४। ६) अर्थात् ते प्रकृतीला अधीन करून प्रगट होत असतात. तात्पर्य, सामान्य प्राणी तर प्रकृतीला परवश होऊन जन्म घेतात तसेच प्रकृतीच्या आश्रित होऊनच कर्म करतात परंतु भगवान् स्वेच्छेने, स्वतंत्रतेने अवतार घेतात आणि प्रकृतीही त्यांच्या अध्यक्षतेखाली काम करत असते.

मूर्खलोक माझ्या अवताराच्या तत्त्वाला जाणून न घेता मला मनुष्यशरीराच्या आश्रित (शरण) मानतात अर्थात् त्यांनी तर मला शरण व्हावयाला पाहिजे परंतु मला मनुष्याला शरण असलेला मानतात. तर मग ते मला कसे शरण येतील? शरण होऊच शकत नाहीत. हीच गोष्ट भगवंतांनी सातव्या अध्यायात म्हटली आहे की, बुद्धिहीन लोक माझ्या अज-अविनाशी परमभावाला न जाणून घेता मला साधारण मनुष्य मानतात (७। २४-२५) म्हणून ते मला शरण न होता देवतांना शरण जातात. (७। २०)

**अवजानन्ति *मां मूढाः**—ज्याच्या अध्यक्षतेखाली प्रकृती अनंत ब्रह्मांडाला उत्पन्न आणि लीन करत असते, ज्याच्या सत्ता-स्फूर्तीने संसारात सर्व काही होत आहे आणि ज्याने कृपा करून आपल्या प्राप्तीसाठी मनुष्यशरीर दिले आहे—अशा माझ्या सत्य तत्त्वाची मूर्ख लोक अवहेलना करतात. ते मला न मानता उत्पत्ति-विनाशशील पदार्थांनाच सत्य मानून त्यांचा संग्रह करणे आणि भोग भोगणे यातच मग्न राहत असतात—हीच माझी अवज्ञा-अवहेलना करणे आहे.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात भगवंताच्या प्रभावाचे विशेष वर्णन झाले आहे. भगवंतापेक्षा मोठा कोणी ईश्वर नाही. ते सर्वोपरी आहेत. परंतु अज्ञानी मनुष्य त्यांना स्वरूपाने जाणत नाही. ते अलौकिक भगवंतालाही आपल्यासारखे लौकिक समजतात.

काहीलोक असे मानतात की, भगवान् श्रीकृष्ण एक योगी होते, ईश्वर नव्हते. योगाची आठ अंग आहेत—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी (योगदर्शन २।२९). यात सर्वात प्रथम 'यम' येते. यम पाच आहेत—अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह (योगदर्शन २।३०). म्हणून जो योगी असेल तो यमाचे पालन अवश्य करेल अर्थात् तो सत्यच बोलेल. तर जो असत्य बोलत असेल तर तो योगी होऊ शकत नाही. कारण त्याने योगाच्या पहिल्या अंगाचे (यमाचे) पालन केले नाही! गीतेत भगवंताने (श्रीकृष्णाने) ठिक ठिकाणी स्वतःला ईश्वर म्हटले आहे.† म्हणून ते जर योगी आहेत तर ते सत्य बोलतात आणि जर ते सत्य बोलतात तर ते समग्र ईश्वर आहेत—हे मानावेच लागेल.

***संबंध**—आता भगवान् पुढील श्लोकात आपल्या अवज्ञतेचे फल सांगतात.*

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः॥१२॥**

**आसुरीम्** = (जे) आसुरी,
**राक्षसीम्** = राक्षसी
**च** = आणि
**मोहिनीम्** = मोहिनी
**प्रकृतिम्, एव** = प्रकृतीचाच
**श्रिताः** = आश्रय घेतात
**विचेतसः** = अशा अविवेकी माणसांच्या
**मोघाशाः** = सर्व आशा व्यर्थ होतात,
**मोघकर्माणः** = सर्व शुभकर्म व्यर्थ होतात (आणि)
**मोघज्ञानाः** = सर्वज्ञान व्यर्थ होते अर्थात् त्यांच्या आशा, कर्म आणि ज्ञान (विचार) सत्-फल देणारे होत नाहीत.

***व्याख्या***—**मोघाशाः**—जे लोक भगवंताशी विमुख होतात, ते सांसारिक भोग इच्छितात, स्वर्ग इच्छितात तर त्यांच्या त्या सर्व कामना व्यर्थच होतात. कारण नाशवान आणि परिवर्तनशील वस्तूची कामना पूर्ण होईलच असा काही नियम नाही. जर कधी पूर्ण झालीच तर ती टिकणार नाही अर्थात् फल देऊन नष्ट होईल. जोपर्यंत परमात्म्याची प्राप्ती होत नाही, तोपर्यंत कितीही सांसारिक वस्तूंची इच्छा करा आणि त्यांचे फलही जरी मिळाले तरीही ते सर्व व्यर्थ आहे. (७।२३)

**मोघकर्माणः**—भगवंताला विमुख झालेल्या मनुष्याने शास्त्रविहित कितीही शुभ कर्म केली परंतु शेवटी ती सर्व व्यर्थच होतात. कारण मनुष्य जर सकामभावनेने शास्त्रविहित यज्ञ, दान इत्यादी कर्मही करेल तरीही त्या कर्मांचा आरंभ आणि अंत होईल आणि त्यांच्या फलाचाही आदि आणि अंत होईल. ते त्या कर्माचे फल म्हणून उच्च-उच्च लोकांतही गेले तरीही तेथून त्यांना पुन्हा जन्म-मरणात यावेच लागते. म्हणून त्यांनी कर्म करून केवळ आपले आयुष्य व्यर्थ गमावले, आपली बुद्धी वाया घालविली आणि पदरात काही पडले नाही. शेवटी रिकामेच राहिले अर्थात् ज्याच्यासाठी मनुष्यशरीर मिळाले होते त्या लाभापासून नेहमीसाठी ते वंचित राहिले म्हणून त्यांचे सर्व कर्म व्यर्थ, निष्फलच झाले.

तात्पर्य, मानव साक्षात् परमात्म्याचे अंश आहेत, सर्वकाळ राहणारे आहेत आणि कर्म तथा त्यांचे फल आदि-अंत असणारे आहे. म्हणून जोपर्यंत परमात्मप्राप्ती होणार नाही तोपर्यंत त्यांनी सकामभावनेने कितीही कर्म केले आणि त्यांचे फलही भोगले परंतु शेवटी दुःख आणि अशांती याशिवाय दुसरे काहीही मिळणार नाही.

जी शास्त्रविहित कर्म अनुकूल परिस्थिती प्राप्त करण्याच्या इच्छेने सकामभावपूर्वक केली जातात, तीच

* 'भूतानामीश्वरोऽपि सन्' (४।६), 'सर्वलोक महेश्वरम्' (५।२९), 'मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति' (७।७), 'मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना' (९।४), 'यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्' (१०।३), 'सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टः' (१५।१५) इत्यादी-इत्यादी.

† या अध्यायाच्या चौथ्या श्लोकापासून दहाव्या श्लोकापर्यंत ज्या परमात्म्याचे वर्णन झाले आहे. त्यालाच येथे माम् पदाने म्हटले गेले आहे.

कर्म व्यर्थ होतात अर्थात् सत् फल देणारी नसतात. परंतु जी कर्म भगवंतासाठी, भगवंताच्या प्रसन्नतेसाठी केली जातात आणि जी कर्म भगवंताला अर्पण केली जातात, ती कर्म निष्फल होत नाहीत अर्थात् नाशवान् फल देणारी होत नाहीत तर सत् फल देणारी होतात-''**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते**'' (१७।२७)

सतराव्या अध्यायाच्या अठ्ठावीसाव्या श्लोकातही भगवंतांनी म्हटले आहे की, ज्यांची माझ्याविषयी श्रद्धा नाही अर्थात् जे मला विमुख असतात, त्यांच्याकडून केले गेलेले यज्ञ, दान, तप इत्यादी सर्व कर्म असत् होतात अर्थात् माझी प्राप्ती करविणारे नसतात. त्या कर्मांचे स्थायी फल या जन्मात आणि मृत्यूनंतरही (परलोकात) मिळत नाही अर्थात् जे काही फल मिळत असते, विनाशीच मिळत असते. म्हणून त्यांची ती सर्व कर्म व्यर्थच होतात.

**मोघज्ञानाः**—त्यांचे सर्व ज्ञान व्यर्थ असते. भगवंताला विमुख होऊन त्यांनी संसारातील सर्व भाषेचे ज्ञान मिळवले, सर्व लीपी अवगत केल्या, निरनिराळ्या कला शिकून घेतल्या, अनेक प्रकारच्या विद्येचे ज्ञान मिळविले, अनेक प्रकारचे अविष्कार निर्माण केले, अनंत प्रकारचे ज्ञान मिळविले, परंतु यापासून त्यांचे कल्याण होणार नाही, जन्म-मरण सुटणार नाही. म्हणून ते सर्व ज्ञान निष्फल आहे. जसे हिशोब करताना एका अंकाची जरी चूक झाली तर सर्व हिशोबच चुकत असतो. त्याप्रमाणेच जे भगवंताला विमुख झाले आहेत त्यांनी कितीही, काहीही ज्ञान संपादन केले तरी ते सर्वच चूक होईल आणि पतनाकडे घेऊन जाईल.

**विचेतसः**—त्यांना सार-असार, नित्य-अनित्य, लाभ-हानी, कर्तव्य-अकर्तव्य, मुक्ती-बंधन इत्यादी गोष्टींचे ज्ञान नसते.

**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः**—जी माणसे आपला स्वार्थ सिद्ध करण्यात, आपली कामनापूर्ती करण्यात, आपल्या प्राणांचे पोषण करण्यातच मग्न झाली आहेत. दुसऱ्यांना किती दुःख होत आहे, दुसऱ्याचे किती नुकसान होत आहे, याची परवाच करीत नाहीत, ती ''आसुरी'' स्वभावाची असतात.

ज्यांच्या स्वार्थात, कामनापूर्तीत जेव्हा बाधा होते तेव्हा त्यांना क्रोध येतो आणि क्रोधाच्या भरात आपला स्वार्थ सिद्ध करण्यासाठी दुसऱ्यांचे नुकसान करतात, दुसऱ्यांचा नाश करतात ते ''राक्षसी'' स्वभावाचे असतात.

ज्यांचा आपला स्वतःचा कोणताही स्वार्थ नसतो, परमार्थही करत नाहीत, वैरही नसते, तरीही विनाकारण जे दुसऱ्याचे नुकसान करतात, दुसऱ्यांना दुःख देतात, (जसे आकाशात विचरण करत असलेल्या पक्ष्याला गोळी मारणे, झोपलेल्या कुत्र्याला काठी मारणे आणि प्रसन्न होणे)ते ''मोहिनी'' स्वभावाचे असतात.

परमात्म्याला विमुख होऊन केवळ प्राणपोषणाची अर्थात् सुखपूर्वक जगण्याची जी इच्छा असते ती ''आसुरी'' प्रकृती आहे. वर ज्या तीन प्रकारच्या प्रकृती (आसुरी, राक्षसी आणि मोहिनी) सांगितल्या गेल्या आहेत, त्याच्या मूळात आसुरी प्रकृतीच आहे. अर्थात् आसुरी संपत्तीच सर्वांचे मूळ आहे. एका आसुरी संपत्तीच्या आश्रित झाल्यावर राक्षसी आणि मोहिनी प्रकृती ही स्वाभाविकच निर्माण होत असते. कारण उत्पत्ति-विनाशशील पदार्थांचे ध्येय असल्याने सर्व अनर्थ परंपराच येत असते. त्याच आसुरी संपत्तीचे तीन भेद येथे सांगितले आहेत—कामनेची प्रधानता असलेली ''आसुरी,'' क्रोधाची प्रधानता असणारी ''राक्षसी'' आणि मोहाची (मुर्खपणा) प्रधानता असणारी ''मोहिनी'' प्रकृती असते. तात्पर्य, कामनेची प्रधानता झाल्यास आसुरी प्रकृती निर्माण होत असते. जेथे कामनेची प्रधानता असते तेथे राक्षसी प्रकृती-क्रोध येतच असतो—''**कामात्क्रोधोऽभिजायते**'' (२।६२) आणि जेथे क्रोध येतो तेथे मोहिनी प्रकृती (मोह) येतेच. ''**क्रोधाद्भवति सम्मोहः**'' (२।६३) हा सम्मोह लोभानेही होत असतो आणि मूर्खतेनेही होत असतो.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात आसुरी संपत्तीचा विषय आला आहे, ज्याचे फलासहित विस्ताराने वर्णन भगवंताने सोळाव्या अध्यायात केले आहे. आसुरी संपत्तीचे फल आहे—चौऱ्यांशी लक्ष योनींची आणि नरकांची प्राप्ती (गीता १६।१९-२०). आसुरी प्रकृतीची माणसे जे फल इच्छितात ते तर त्यांना मिळत नाही (**मोघाशाः**), परंतु अनिष्ट फल (दंड) तर त्यांना मिळतोच. ते पाप करतात सुख प्राप्तीसाठी, परंतु सुख तर मिळत नाही, दुःख अवश्य भोगावे लागते. ते करतात भगवंताची अवज्ञा परंतु परिणामी आपलेच नुकसान करतात, भगवंतात काय फरक पडतो?

***संबंध***—*चौथ्या श्लोकापासून दहाव्या श्लोकापर्यंत भगवंतांनी आपला प्रभाव, सामर्थ्य इत्यादीचे वर्णन केले. त्या प्रभावाला न मानणाऱ्यांचे वर्णन तर अकराव्या आणि बाराव्या श्लोकांत केले. आता त्या प्रभावाला जाणून घेऊन भजन करणाऱ्यांचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

# महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः।
# भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्॥ १३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| तु | = परंतु | अनन्य मनसः | = अनन्य मनवाले | | आदी |
| पार्थ | = हे पृथानंदन! | महात्मानः | = महात्मालोक | अव्ययम् | = (आणि) अविनाशी |
| दैवीम् | = दैवी | माम् | = मला | ज्ञात्वा | = जाणून |
| प्रकृतिम् | = प्रकृतीचे | भूतादिम् | = संपूर्ण प्राण्यांचा | भजन्ति | = (माझे) भजन करतात. |
| आश्रिताः | = आश्रित | | | | |

*व्याख्या*— **महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः**—पूर्व श्लोकात ज्या आसुरी, राक्षसी आणि मोहिनी स्वभावाचा आश्रय घेतलेल्या मूर्ख लोकांचे वर्णन केले होते. त्यापेक्षा दैवी प्रकृतीचा आश्रय घेतलेल्या महात्म्यांची विलक्षणता दाखविण्यासाठीच येथे ''तु'' पद आले आहे.

**दैवीं प्रकृतिम्**—अर्थात् दैवी संपत्तीत ''देव'' परमात्म्याचे नाव आहे आणि परमात्म्याची संपत्ती दैवी संपत्ती म्हटली जाते. परमात्मा सत् आहे, म्हणून परमात्म्याची प्राप्ती करून देणारे जितके गुण आणि आचरण आहेत; त्यांच्या-बरोबर सत् शब्द लागत असतो. अर्थात् ते सद्‌गुण आणि सदाचार म्हणविले जातात. जितके काही सद्‌गुण-सदाचार आहेत ते सर्वचे सर्व भगवत्स्वरूप आहेत अर्थात् ते सर्व भगवंताचेच स्वभाव असतात आणि स्वभाव असल्यानेच त्यांना ''प्रकृति'' म्हटले गेले आहे. म्हणून दैवी प्रकृतीचा आश्रय घेणे म्हणजेच भगवंताचाच आश्रय घेणे आहे.

दैवी संपत्तीचे जितके काही गुण आहेत (१६। १-३) ते सर्वसामान्य गुण आहेत आणि स्वत:सिद्ध आहेत अर्थात् या गुणांवर सर्व मनुष्यांचा पूर्ण अधिकार आहे. आता या गुणांचा कोणी आश्रय घेवो अथवा न घेवो—हे तर मनुष्यावर अवलंबून आहे. परंतु जे यांचा आश्रय घेऊन परमात्म्याकडे वाटचाल करतात, ते आपले कल्याण करून घेतात.

एक शोध असतो आणि एक उत्पत्ती असते. शोध नित्यतत्त्वाचा असतो, जे पूर्वीपासूनच असते. ज्या वस्तूची उत्पत्ती होते, ती वस्तू नष्ट होत असते. दैवी संपत्तीचे जितके सद्‌गुण सदाचार आहेत त्यांना भगवंताचे आणि भगवत्स्वरूप समजून धारण करणे, त्यांचा आश्रय घेणे ''शोध'' आहे. कारण हे कोणी उत्पन्न केलेले नव्हेत. अर्थात् ही कोणाची व्यक्तिगत निर्मिती, पैतृक संपत्ती नव्हे. जो या गुणांना आपल्या पुरुषार्थाने मिळविलेले असे मानतो अर्थात् स्वाभाविक न मानता आपण निर्माण केले असे मानतो, त्याला ह्या गुणांचा अभिमान होतो. हा अभिमानच वास्तविक प्राण्यांची व्यक्तिगत उत्पत्ती आहे जी नष्ट होणारी आहे.

जर मनुष्य दैवी गुणांना आपल्या सामर्थ्याने मिळविलेले असे मानतो आणि ''मी सत्य बोलतो दुसरे सत्य बोलत नाहीत,'' याप्रमाणे दुसऱ्यापेक्षा आपल्याला विशेष मानतो; तेव्हा त्याच्या ठिकाणी या गुणांचा अभिमान उत्पन्न होतो. परंतु या गुणांना केवळ भगवंताचेच गुण मानल्याने आणि भगवत्स्वरूप समजून त्यांचा आश्रय घेतल्याने अभिमान उत्पन्न होत नाही.

दैवी संपत्तीच्या अर्धवटपणामुळेच अभिमान निर्माण होतो. दैवी संपत्ती (आपल्यात) पूर्ण बाणल्यावर अभिमान निर्माण होत नाही. जसे एखाद्याला ''मी सत्यवादी आहे'' याचा अभिमान होतो, तेव्हा त्याचे ठिकाणी सत्यभाषणाबरोबर अंशिक असत्य भाषणही असते. जर संपूर्णपणे सत्य भाषण असले तर मी सत्य बोलणारा आहे'' याचा अभिमान होऊच शकत नाही. तर त्याचा असा भाव राहतो की, ''मी सत्यवादी आहे तर मी असत्य कसे बोलू शकतो?''

मनुष्याचे ठिकाणी, जेव्हा त्याचा उद्देश केवळ भगवत्-प्राप्तीचा असतो, तेव्हा दैवी संपत्ती प्रगट होत असते. भगवत्प्राप्तीसाठी दैवी गुणांचा आश्रय घेऊनच तो परमात्म्याकडे वेगाने वाटचाल करू शकतो. दैवीगुणांचा आश्रय घेतल्याने त्याला अभिमान होत नाही, तर नम्रता, सरळता, निरभिमानता जागृत होते आणि साधनेत नित्य नवा उत्साह वाढत राहतो.

जी माणसे भगवंताला विमुख होऊन उत्पत्ति-विनाशशील भोग आणि त्यांच्या संग्रहात लागलेली असतात ती ''अल्पात्मा'' आहेत, अर्थात् मूर्ख आहेत. परंतु ज्यांनी भगवंताचा आश्रय घेतलेला असतो, ज्यांचा मूर्खपणा नाहीसा झाला आहे आणि ज्यांनी केवळ भगवंताशी आपला संबंध जोडला आहे, तर महानशी संबंध जोडलेला असल्याने, सत्य तत्त्व हेच लक्ष्य असल्याने ती ''महात्मा'' आहेत.

**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्**—मी संपूर्ण प्राण्यांचा आदि आहे आणि अविनाशी आहे. तात्पर्य संसार उत्पन्न झाला नव्हता, त्यावेळी मी होतो आणि सर्व संसार लीन होईल त्यावेळीही मी राहील—

असा मी अनादी अनंत आहे. अनंत ब्रह्मांड, अनंत सृष्टी, अनंत स्थावर जंगम प्राणी माझ्यापासून उत्पन्न होतात, माझ्यातच राहतात, माझ्याकडूनच त्यांचे पालन होते आणि माझ्यातच लीन होतात. परंतु मी जसाच्या तसा निर्विकार राहत असतो, अर्थात् माझ्यात कधी किंचित्मात्रही न्यूनता येत नाही.

सांसारिक वस्तूंचा हा नियम आहे की, एखाद्या वस्तू-पासून एखादी वस्तू निर्माण झाली तर त्या वस्तूत उणीव येते. जसे मातीपासून भांडी निर्माण झाली तर माती कमी होते, सोन्यापासून दागिने बनल्यावर सोन्यात कमी येते इत्यादी. परंतु माझ्यापासून अनंत सृष्टी उत्पन्न होऊनही माझ्यात किंचितमात्रही उणीव येत नाही, कारण मी सर्वांचे अव्यय बीज आहे (९।१८). ज्या मनुष्यांनी मला अनादी आणि अव्यय जाणून घेतले आहे, ते अनन्यमनाने माझेच भजन करत असतात.

जो ज्याच्या माहात्म्याला जितके अधिक जाणत असतो तो तितकाच अधिक त्यामध्ये व्यस्त होत असतो. ज्यांनी भगवंताला सर्वोपरी जाणून घेतले आहे ते भगवंताच्याच भक्तीत लागतात. त्यांना ओळखण्यासाठी येथे "**अनन्यमनसः**" पद आले आहे. त्यांचे मन भगवंतातच लीन झाल्याने त्यांची वृत्ती इहलोकीच्या आणि परलोकीच्या भोगाकडे धाव घेत नाही. भोगाविषयी त्यांची महत्त्वबुद्धी नसते.

"अनन्यमनाचा" होण्याचे तात्पर्य, त्यांच्या मनात इतरांचा आश्रय नसतो, आधार नसतो, भरवसा नसतो, इतर कोणाचे ठिकाणी आकर्षण नसते आणि केवळ भगवंताविषयीच आत्मीयता असते. अशा प्रकारे ते अनन्यमनाने भगवंताचे भजन करत असतात.

भगवंताचे भजन कोण्याही प्रकाराने केले तरी त्यापासून लाभच होतो. परंतु भगवंताशी अनन्य होऊन "मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत" असा संबंध जोडून थोडे-ही भजन केले गेले तर त्यापासून पुष्कळ लाभ होतो. कारण आत्मीयतेचा संबंध (भावरूप असल्याने) नित्य-निरंतर राहत असतो. परंतु क्रियेचा संबंध नित्य-निरंतर राहत नसतो. क्रिया संपताच त्याचा संबंध सुटतो. म्हणून सर्वांचे आदि आणि अविनाशी परमात्मा माझे आहेत आणि मी त्यांचा आहे असे ज्याने मानले आहे तो स्वतः आपल्याला भगवंताच्या चरणावर अर्पित करून शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीने जे काही शरीरिक, व्यावहारिक, लौकिक, वैदिक, पारमार्थिक कार्य करत असतो, ते सर्व भजनरूपाने भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच होत असतात. हेच त्याचे अनन्यमनाने भजन करणे आहे. याचे वर्णन गीतेत ठिक-ठिकाणी झाले आहे. (जसे, ८।१४, ९।२२; १२।६; १४।२६)

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लेकात पतनाकडे जाणाऱ्या संसारी माणसांचे वर्णन करून आता त्याहून विलक्षण अशा भगवंताकडे आकृष्ट होणाऱ्यांचे (भक्तांचे) वर्णन करतात. 'दैवी प्रकृती' चा अर्थ आहे—भगवंताचा स्वभाव.

आसुरी प्रकृतीच्या आश्रित असलेली माणसे भगवंतानाही मानीत नाहीत आणि त्यांच्या आज्ञाही मानीत नाहीत. (३।३२) परंतु दैवी प्रकृतीच्या आश्रित असलेली माणसे भगवंतानाही मानतात आणि त्यांच्या अज्ञांनाही मानतात. (३।३१)

**'ज्ञात्वा भूतादिमव्ययम्'**—अनंत ब्रह्मांडांचे अविनाशी बीज भगवान्च आहेत (गीता ७।१०, ९।१८)—अशाप्रकारे दृढतापूर्वक मानणे हेच भगवंताला आदी आणि अविनाशी जाणणे आहे. दृढ मान्यता हीच जाणण्यासारखी असते. भगवान् सर्वांचे आदी आणि अविनाशी आहेत—याचे वर्णन याच अध्यायाच्या चौथ्या श्लेकापासून अकराव्या श्लेकापर्यंत झाले आहे.

***संबंध**—मागील श्लोकात भजन करणाऱ्यांचे वर्णन करून आता भगवान् पुढील श्लोकात त्यांच्या भजनाचा प्रकार सांगतात.*

## सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः।
## नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते॥१४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **नित्ययुक्ताः** | = नित्य-निरंतर (माझ्यात) लागेलेली माणसे | | साधनेत लागून | **माम्** | = मला |
| | | **च** | = आणि | **नमस्यन्तः** | = नमस्कार करीत |
| | | **भक्त्या** | = प्रेमपूर्वक | **सततम्** | = निरंतर |
| **दृढव्रताः** | = दृढव्रती होऊन | **कीर्तयन्तः** | = कीर्तन करीत | **माम्** | = माझी |
| **यतन्तः** | = लगनपूर्वक | **च** | = तसेच | **उपासते** | = उपासना करतात. |

*व्याख्या*— **नित्ययुक्ताः**—मनुष्य केवळ भगवंताचे ठिकाणीच नित्य-निरंतर युक्त राहू शकतो, सांसारिक भोग आणि संग्रहात नव्हे. कारण कधी-कधी भोगापासूनही ग्लानी येते आणि संग्रहापासूनही उपरती होत असते. परंतु भगवंताच्या

प्राप्तीचा, भगवंताकडे वाटचाल करण्याचा जो एक उद्देश बनलेला असतो, एक दृढ विचार असतो त्यात कधीही फरक पडत नाही.

भगवंताचा अंश असल्याने जीवाचा भगवंताशी अखंड संबंध आहे. मनुष्य जोपर्यंत त्या संबंधाला ओळखत नाही, तोपर्यंत तो भगवंताशी विमुख राहत असतो, आपल्याला भगवंतापासून वेगळा मानतो. परंतु जेव्हा तो भगवंताशी असलेल्या आपल्या नित्यसंबंधाला ओळखून घेतो, मग तो भगवंताला सम्मुख होत असतो. भगवंतापासून वेगळा राहू शकत नाही आणि त्याला भगवंताच्या संबंधाची विस्मृतीही होत नाही. हेच त्याचे ''नित्ययुक्त'' राहणे आहे.

मनुष्याचा भगवंताशी ''मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत'' असा जो स्वचा संबंध आहे, तो जागृत, स्वप्न, सुषुप्ती या अवस्थेत, एकांतात, भजन-ध्यान करताना अथवा सेवारूपाने संसाराचे सर्व काम करत असतानाही कधी खंडित होत नाही, अटळरूपाने नेहमीच कायम राहतो. जसे मनुष्य स्वत:ला ज्या आई-बापाचे मानतो सर्व काम करतानाही त्याचा ''मी अमुकाचा मुलगा आहे'' हा भाव नित्य कायम असतो. मग त्याला स्मरण असो अथवा नसो, तो स्मरण करो अथवा न करो, परंतु हा भाव नित्य-निरंतर राहतो. कारण ''मी अमुकाचा मुलगा आहे'' हा भाव त्याच्या ''मी'' पणात बसलेला असतो. तसेच जो ''अनादी, अविनाशी, सर्वोपरी भगवान्‌च माझे आहेत आणि मी त्यांचाच आहे'' या वास्तविकतेला जाणून घेतो, मानून घेतो त्याचा हा भाव नित्य कायम राहत असतो. अशा प्रकारे भगवंताशी आपला वास्तविक संबंध मानणे हेच ''नित्ययुक्त'' होणे आहे.

**दृढव्रता:**—जे सांसारिक भोग आणि संग्रहात गुंतलेले आहेत ते जो पारमार्थिक निश्चय करतात, तो निश्चय दृढ नसतो (२।४४) परंतु ज्यांनी अंत:करणापासूनच आपल्या मी-पणाला बदलून टाकले आहे की, ''आपण भगवंताचे आहोत आणि भगवंत आपले आहेत,'' त्यांचा असा दृढ निश्चय होतो की, ''आपण संसाराचे नाही आणि संसार आपला नाही''. म्हणून आपल्याला सांसारिक भोग आणि संग्रहाकडे कधी वळायचेच नाही, तर भगवंताच्या नात्याने केवळ सेवा करायची आहे. अशा प्रकारे त्यांचा निश्चय फार दृढ असतो. आपल्या निश्चयापासून ते कधी विचलित होत नाहीत. कारण त्यांचा उद्देश भगवंताचा आहे आणि ते स्वत:ही भगवंताचे अंश आहेत. त्यांच्या निश्चयात अदृढता येण्याचा प्रश्नच नसतो. अदृढता तर सांसारिक निश्चयामध्ये येत असते, जी टिकणारी नसते.

**यतन्तश्च**—जसे सांसारिक माणसे कुंटुंबाचे पालन करत असतात तर ममतापूर्वक करत असतात, रुपये मिळवतात ते लोभपूर्वक मिळवतात तसेच भगवंताचे भक्त भगवत्प्राप्तीसाठी प्रयत्न (साधन) करत असतात तर मनापासून करत असतात. त्यांचे प्रयत्न सांसारिक दिसत असले, तरीही वास्तविक संसारी नसतात कारण त्यांच्या संपूर्ण प्रयत्नाचा उद्देश भगवंतच असतात.

**भक्त्या कीर्तयन्तो माम्**—ते भक्त केव्हा प्रेमाने भगवंताच्या नामाचे कीर्तन करत असतात, केव्हा नाप-जप करत असतात, केव्हा पाठ करत असतात, केव्हा नित्यकर्म करत असतात, केव्हा भगवंताच्या कथा ऐकवतात, इत्यादी इत्यादी. ते ज्या काही वाणीसंबंधी क्रिया करतात, त्या सर्व भगवंताचे स्तोत्रच होतात ''**स्तोत्राणि सर्वा गिर:**''

**नमस्यन्तश्च**—ते भक्तिपूर्वक भगवंताला नमस्कार करतात. त्यांचे ठिकाणी सद्‌गुण सदाचार निर्माण होतात, त्यांच्याकडून भगवंताला अनुकूल अशी एखादी क्रिया घडली तर ते या भावनेने भगवंताला नमस्कार करतात की, ''हे नाथ! हे सर्व आपल्या कृपेनेच होत आहे. आपल्याविषयी माझी जी अभिरुची आणि तत्परता झाली आहे, ती माझ्या प्रयत्नाने नव्हे. म्हणून हे सद्‌गुण-सदाचार, ही साधना आपल्या कृपेनेच झाली असे समजून मी तर केवळ आपणाला नमस्कारच करू शकतो.''

**सततं मां उपासते**—अशा प्रकारे माझे अनन्य भक्त निरंतर माझी उपासना करत असतात,निरंतर उपासना करण्याचे तात्पर्य, ते कीर्तन, नमस्कार इत्यादीशिवाय जे काही खाणे-पिणे, झोपणे-जागणे, तसेच व्यापार करणे, शेती करणे, इत्यादी साधारण क्रिया करत असतात, त्या सर्व माझ्या-साठीच करत असतात. त्यांच्या संपूर्ण लौकिक, पारमार्थिक क्रिया केवळ माझ्या उद्देशाने, माझ्या प्रसन्नतेसाठीच होतात.

**परिशिष्ट भाव**—भक्त जे काही उच्चारण करतो ते सर्व भगवंताचे कीर्तनच आहेत. तो जी काही क्रिया करतो ती सर्व भगवंताची सेवाच आहे.* (गीता ९।२७)

* कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा बुद्ध्याऽऽत्मना वानुसृत स्वभावात्।
करोति यद् यत् सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत्॥ (श्रीमद्भा० ११।२।३६)
'शरीराने, वाणीने, मनाने, इंद्रियांनी, बुद्धीने, अहंकाराने अथवा अनुकूल स्वभावाने मनुष्य जे जे करेल, ते सर्व परमपुरुष भगवान्

अनित्य अशा संसाराशी संबंध-विच्छेद केल्यामुळे भक्त नित्ययुक्त होतात.

***संबंध**—अनित्य संसाराशी संबंध-विच्छेद करून, नित्य तत्त्वाकडे वाटचाल करणारे साधक अनेक प्रकारचे असतात. त्यापैकी भक्तीच्या साधकांचे वर्णन मागील दोन श्लोकांत केले. आता दुसऱ्या साधकांचे वर्णन पुढील श्लोकात करत आहेत.*

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्॥ १५॥**

**अन्ये** = दुसरे साधक
**ज्ञानयज्ञेन** = ज्ञानयज्ञाद्वारा
**एकत्वेन** = एकीभावाने (अभेदभावाने)
**माम्** = माझे
**यजन्तः** = पूजन करीत
**उपासते** = माझी उपासना करतात
**च** = आणि
**अपि** = दुसरेही कित्येक साधक
**पृथक्त्वेन** = (स्वत:ला) पृथक् मानून
**विश्वतोमुखम्** = चहू बाजूला मुख असणाऱ्या माझ्या विराटरूपाची अर्थात् संसाराला माझे विराटरूप मानून सेव्य-सेवकभावाने
**बहुधा** = (माझी) अनेक प्रकाराने (उपासना करतात).

***व्याख्या**—* [जसे भुकेल्या माणसांची भूक एक असते आणि भोजन केल्यावर सर्वांची तृप्तीही एकच असते. परंतु त्यांची भोजनाच्या पदार्थांत रुची भिन्न-भिन्न असते. तसेच परिवर्तनशील अनित्य संसाराकडे वळलेले लोक काहीही करतात परंतु त्यांची तृप्ती होत नाही, ते अभावग्रस्तच राहतात. जेव्हा ते संसाराशी विमुख होऊन केवळ परमात्म्याकडेच वळतात तेव्हा परमात्म्याची प्राप्ती झाल्यावर त्या सर्वांची तृप्ती होत असते अर्थात् ते कृतकृत्य, ज्ञातज्ञातव्य आणि प्राप्तप्राप्तव्य होतात. परंतु त्यांची रुची, योग्यता, श्रद्धा, विश्वास, इत्यादी भिन्न-भिन्न असतात. म्हणून त्यांच्या उपसनाही भिन्न भिन्न असतात.]

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते एकत्वेन**—कित्येक ज्ञानयोगी साधक ज्ञानयज्ञाने अर्थात् विवेकपूर्वक असत्‌चा त्याग करून सर्वत्र व्यापक असलेल्या परमात्म-तत्त्वाला आणि आपल्या वास्तविक स्वरूपाला एक मानून माझ्या निर्गुण-निराकर स्वरूपाची उपासना करत असतात.

या परिवर्तनशील संसाराची कोणती स्वतंत्र सत्ता नसते. कारण हा संसार पूर्वी अभावरूपानेच होता आणि आत्ताही अभावात जात आहे. म्हणून हा अभावरूपीच आहे. ज्यापासून संसार उत्पन्न झाला आहे, ज्याच्या आश्रित आहे आणि ज्याच्याकडून प्रकाशित होतो, त्या परमात्म्याच्या सत्तेनेच याची सत्ता प्रतीत होत असते. त्या परमात्म्याशी आपली एकता आहे. अशा प्रकारे त्या परमात्म्याकडे नित्य-निरंतर दृष्टी ठेवणे हेच एकीभावाने उपासना करणे आहे.

येथे "**यजन्तः**" पदाचे तात्पर्य, त्यांच्या अंत:करणात केवळ परमात्मतत्त्वाचाच आदर असतो. हेच त्यांचे पूजन आहे.

**पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्**—त्याचप्रमाणे कित्येक कर्मयोगी साधक आपल्याला सेवक समजून आणि संपूर्ण संसाराला भगवंताचे विराट्‌रूप समजून आपल्या शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीच्या संपूर्ण क्रियांना तसेच पदार्थांना संसाराच्या सेवेतच उपयोगात आणत असतात. या सर्वांना सुख कसे मिळेल, सर्वांचे दु:ख कसे समाप्त होईल, यांची सेवा कशी होईल—अशा विचाराने ते आपल्या तन, मन, धन इत्यादीने जनता जनार्दनाच्या सेवेमध्येच व्यस्त असतात. भगवत्कृपेने त्यांना पूर्णतेची प्राप्ती होत असते.

**परिशिष्ट भाव**—सर्वच साधक स्वत:ची रुची, योग्यता आणि श्रद्धा-विश्वास यानुसार वेग-वेगळ्या साधनांनी ज्या कोणाचीही उपासना करतात, ती भगवंताच्या समग्ररूपाचीच उपासना होते. पुढे सोळाव्यापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत याच समग्ररूपाचे वर्णन झाले आहे.

***संबंध**—जर सर्व उपासना वेगवेगळ्या आहेत तर मग सर्व उपासना आपल्या (भगवंताच्या) कशा होतील? यावर पुढील चार श्लोक सांगतात.*

---

नारायणासाठीच आहे. या भावनेने त्यांना समर्पित करावे.'

सञ्चारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो।
यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम्॥ (शिवमानसपूजा)

'हे शम्भो! माझे चालणे-फिरणेही आपली प्रदक्षिणा आहे आणि संपूर्ण शब्द आपले स्तोत्र आहेत. मी जे जे काही कर्म करतो ती सर्व आपली आराधनाच आहे.'

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम्।**
**मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्॥ १६ ॥***
**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः।**
**वेद्यं पवित्रमोङ्कार ऋक्साम यजुरेव च॥ १७॥**
**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्॥ १८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **क्रतुः** | = क्रतु | **अहम्** | = मी आहे. | **गतिः** | = गती, |
| **अहम्** | = मी आहे, | **वेद्यम्** | = जाणण्यायोग्य | **भर्ता** | = भरण-पोषण करणारा, |
| **यज्ञः** | = यज्ञ | **पवित्रम्** | = पवित्र | | |
| **अहम्** | = मी आहे, | **ओङ्कारः** | = ओंकार (तसेच) | **प्रभुः** | = प्रभू, |
| **स्वधा** | = स्वधा | **ऋक्** | = ऋग्वेद, | **साक्षी** | = साक्षी, |
| **अहम्** | = मी आहे, | **साम** | = सामवेद | **निवासः** | = निवास स्थान, |
| **औषधम्** | = औषध | **च** | = आणि | **शरणम्** | = आश्रय, |
| **अहम्** | = मी आहे, | **यजुः, एव** | = यजुर्वेदही | **सुहृत्** | = सुहृद, |
| **मन्त्रः** | = मंत्र | **अहम्** | = मीच आहे. | **प्रभवः** | = उत्पत्ती, |
| **अहम्** | = मी आहे, | **अस्य** | = ह्या | **प्रलयः** | = प्रलय, |
| **आज्यम्** | = घृत | **जगतः** | = संपूर्ण जगताचा | **स्थानम्** | = स्थान, |
| **अहम्** | = मी आहे, | **पिता** | = पिता, | **निधानम्** | = निधान (भांडार) |
| **अग्निः** | = अग्नी | **धाता** | = धारण करणारा, | **अव्ययम्** | = (आणि) अविनाशी |
| **अहम्** | = मी आहे (आणि) | **माता** | = माता, | **बीजम्** | = बीजही (मीच आहे). |
| **हुतम्, एव** | = हवनरूपी क्रियाही | **पितामहः** | = पितामह, | | |

***व्याख्या***—[आपल्या रुची, श्रद्धा-विश्वासानुसार कोणालाही साक्षात् परमात्म्याचे स्वरूप समजून त्याच्याशी संबंध जोडला तर वास्तविक हा संबंध सत्शीच असतो. केवळ आपल्या मन-बुद्धीत किंचित्मात्रही संशय नसावा. जसे ज्ञानाने मनुष्य सर्व देश, काल, वस्तू, इत्यादीत एका परमात्मतत्त्वालाच जाणून घेत असतो. परमात्म्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, क्रिया इत्यादीची किंचित्मात्रही स्वतंत्र सत्ता नसते, यात त्याला थोडाही संशय राहत नसतो. तसेच भगवंत विराट्रूपाने अनेकरूपात प्रगट होत आहेत. म्हणून सर्व काही भगवंतच भगवंत आहेत यात आपल्याला थोडाही संशय रहावयास नको, कारण ''हे सर्व भगवंत कसे होऊ शकतात?'' हा संशय साधकाला वास्तविक तत्त्वापासून, मुक्तीपासून वंचित करतो आणि भयंकर संकटात लोटून देतो. म्हणून ही गोष्ट दृढतेने मानावी की, कार्य-कारणरूपाने स्थूल-सूक्ष्मरूपी जे काही पाहण्यात, ऐकण्यात सजण्यात आणि मानण्यात येत असते, ते सर्व केवळ भगवंतच आहेत. याच कार्यकारण-रूपाने भगवंताच्या सर्व व्यापकतेचे वर्णन सोळाव्यापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत केले आहे.]

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम्**—जे वैदिक रीतीने केले जाते, त्याला ''क्रतु'' म्हणतात. ते क्रतु मीच आहे. जे स्मार्त (पौराणिक) रीतीने केले जाते, तो ''यज्ञ'' होतो. ज्याला पंचमहायज्ञ इत्यादी स्मार्त कर्म म्हणतात. तो यज्ञ मी आहे. पितरांसाठी जे अन्न अर्पण केले जाते, त्याला

* सातव्या अध्यायापासून बाराव्या अध्यायाच्या या मध्यम षट्कामध्ये भगवंतांनी आपल्या भक्तीचे (उपासनेचे) वर्णन केले आहे आणि त्यात ''अस्मत्'' अर्थात् ''अहम्'', ''मम,'' ''मया'' ''मत्'' इत्यादी शब्दांचा प्रयोग केला आहे. येथे सोळाव्या श्लोकात तर ''अस्मत्'' अर्थात् ''अहम्'' शब्दाचा प्रयोग आठ वेळा केला गेला आहे. ''अहम्'' शब्दाचा इतका अधिक प्रयोग या षट्काच्या दुसऱ्या कोणत्याही श्लोकात केला गेला नाही.

''स्वधा'' म्हणतात. ते स्वधा मीच आहे. त्या क्रतु यज्ञ, स्वधासाठी आवश्यक जी सामुग्री लागते अर्थात् वनस्पती, कंदमुळे, तीळ, जव, इत्यादी औषधी आहेत ते औषधही मीच आहे.

**मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्**—ज्या मंत्राने क्रतु, यज्ञ आणि स्वधा केले जातात, तो मंत्रही मीच आहे. यज्ञ इत्यादीसाठी गायीचे तूप आवश्यक असते ते तूपही मीच आहे. ज्या आहवनीय अग्नीत होम केला जातो, तो अग्नीही मीच आहे आणि हवन करण्याची क्रियाही मीच आहे.

**वेद्यं पवित्रमोङ्कार ऋक्साम यजुरेव च**—वेदांत सांगितलेला जो विधी आहे, त्याला योग्य रीतीने जाणून घेणे ''वेद्य'' आहे. तात्पर्य, कामनापूर्तीसाठी अथवा कामना निवृत्तीसाठी वैदिक आणि शास्त्रीय जे काही क्रतु, यज्ञ इत्यादीचे अनुष्ठान केले जाते, ते विधि-विधानासहित सांगोपांग झाले पाहिजे. म्हणून विधी विधानाला जाणण्यायोग्य सर्व गोष्टी ''वेद्य'' म्हटल्या जातात. ते वेद्य माझे स्वरूप आहे.

यज्ञ, दान आणि तप—या तिन्ही गोष्टी निष्काम पुरुषाला अत्यंत पवित्र करणाऱ्या आहेत—''**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्**'' (१८।५) यात निष्कामभावनेने जे हव्य इत्यादी वस्तू खर्च होतात, तेही पवित्र होतात आणि यात निष्कामभावनेने जी क्रिया केली जाते ती देखील पवित्र होत असते. ही पवित्रता माझे स्वरूप आहे.

क्रतु, यज्ञ इत्यादीचे अनुष्ठान करण्यासाठी ज्या ऋचांचे उच्चारण केले आहे, त्या सर्वात प्रथम ॐ चे उच्चारण केले जाते. याचे उच्चारण केल्यानेच ऋचा अभीष्ट फल देतात. वेद-वादींच्या यज्ञ, दान, तप इत्यादी सर्व क्रिया ॐ चे उच्चारण करूनच आरंभ होतात. (१७।२४) वैदिकांसाठी प्रणवाचे उच्चारण मुख्य आहे, म्हणून भगवंतांनी प्रणवाला आपले स्वरूप म्हटले आहे.

त्या क्रतु, यज्ञ इत्यादीची विधी सांगणारे ऋग्वेद, सामवेद आणि यजुर्वेद हे तीन वेद आहेत. ज्यात नियताक्षर असणाऱ्या मत्रांच्या ऋचा असतात, त्या ऋचांच्या समुदायाला ''ऋग्वेद'' म्हणतात. ज्यात स्वरासह गेय मंत्र आहेत ते सर्व मंत्र ''सामवेद'' म्हटले जातात. ज्यात अनियताक्षर असणारे मंत्र असतात ते मंत्र ''यजुर्वेद'' म्हटले जातात.* हे तिन्ही वेद भगवंताचीच स्वरूपे आहेत.

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः**—या जड चेतन, स्थावर जंगम इत्यादी संपूर्ण संसाराला मीच उत्पन्न करत असतो ''**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः**'' (७।६) आणि वारंवार अवतार घेऊन मीच यांचे रक्षण करत असतो. म्हणून मी ''**पिता**'' आहे. अकराव्या अध्यायाच्या त्रेचाळीसाव्या श्लोकात अर्जुनानेही म्हटले आहे की ''आपणच ह्या चराचर जगताचे पिता आहात''— ''**पितासि लोकस्य चराचरस्य**''

ह्या संसाराला सर्व प्रकाराने मीच धारण करतो आणि संसारमात्राचे जे काही विधान तयार होते, त्या विधानाला बनविणाराही मी आहे म्हणून मी ''**धाता**'' आहे.

जीवांना आपापल्या कर्मानुसार ज्या ज्या योनीत जस-जशा शरीरांची आवश्यकता पडते, त्या त्या योनीत तसतशा शरीरांना उत्पन्न करणारी ''**माता**'' मी आहे, अर्थात् मी संपूर्ण जगताची माता आहे.

सृष्टी उत्पन्नकर्ते ब्रह्मदेव प्रजेचे पिता म्हणून प्रसिद्ध आहेत, ते ब्रह्मदेव माझ्यापासूनच प्रगट होत असतात. या दृष्टीने मी ब्रह्मदेवाचा पिता आणि प्रजेचा ''**पितामह**'' आहे. अर्जुनानेही भगवंताना ब्रह्मदेवाचे आदि कर्ता म्हटले आहे—''**ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे**'' (११-३७)

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्**—प्राण्यांसाठी सर्वोपरी मिळविण्याचे जे तत्त्व असते ते ''**गति**'' स्वरूपी मीच आहे. संपूर्ण संसाराचा भरण-पोषण करणारा ''**भर्ता**'' आणि संसाराचा मालक ''**प्रभू**'' मीच आहे. सर्व काळात सर्वांना योग्य रीतीने जाणणारा ''**साक्षी**'' मी आहे. माझेच अंश असल्याने सर्व जीव स्वरूपाने नित्य निरंतर माझ्यातच राहतात म्हणून त्या सर्वांचे ''**निवास**'' स्थान मीच आहे. ज्याचा आश्रय घेतला जातो तो ''**शरण**'' अर्थात् शरणागत-वत्सल मीच आहे. विनाकारण सर्व प्राण्यांचे हित करणारा ''**सुहृद्**'' अर्थात् हितैषी मीच आहे.

**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्**—संपूर्ण संसार माझ्यापासूनच उत्पन्न होत असतो आणि माझ्यातच लीन होत असतो म्हणून मी ''**प्रभव**'' आणि ''**प्रलय**'' आहे. अर्थात् मीच संसाराचे निमित्त कारण आणि उपादान कारण आहे (७।६)

महाप्रलय झाल्यावर प्रकृतीसह संपूर्ण संसार माझ्यात

* ज्या मंत्रांत अस्त्र-शस्त्र, भवन इत्यादीचे निर्माण करणाऱ्या लौकिक विद्यांचे वर्णन आहे, ते सर्व मंत्र '' अथर्ववेद'' म्हणविले जातात. जरी अनुसमुच्चयार्थ ''च'' अव्ययाने अथर्ववेदाचे ग्रहण केले जाऊ शकते, तरीपण त्यात लौकिक विद्यांचे वर्णन असल्याने क्रतु, यज्ञ इत्यादीच्या अनुष्ठानात त्याचे नाव घेतले गेले नाही. याच कारणामुळे पुढे वीसाव्या एकवीसाव्या श्लोकांत आलेल्या ''त्रैविद्याः'' आणि त्रयी धर्ममनुप्रपन्नाः'' पदांतही ऋक्, साम, यजुः, या तिन्हींचाच संकेत केला गेला आहे.

राहतो, म्हणून मी संसाराचे ''**स्थान**''* आहे.

संसाराची मग सर्ग-अवस्था असो अथवा प्रलय-अवस्था असो, या सर्व अवस्थेत प्रकृती संसार, जीव, तसेच जे काही पाहणे, ऐकणे, समजण्यात येते ते सर्वचे सर्व माझ्यातच राहते म्हणून मी ''**निधान**'' आहे.

सांसारिक बीज तर वृक्षापासून उत्पन्न होत असते आणि वृक्षाला उत्पन्न करून नष्ट होत असते. परंतु हे दोन्हीही दोष माझ्यात नाहीत. मी अनादी आहे अर्थात् उत्पन्न होणारा नव्हे आणि अनंत सृष्टी उत्पन्न करूनही जसाच्या तसाच राहत असतो. म्हणून मी ''**अव्यय बीज**'' आहे.

**परिशिष्ट भाव**—जसे ज्ञानाच्या दृष्टीने गुणच गुणांत वर्तत आहेत—'**गुणा गुणेषु वर्तन्ते**' (गीता ३ । २८), तसेच भक्तीच्या दृष्टीने भगवंताची वस्तूच भगवंताला अर्पित होत आहे. जसे कोणी गंगाजलाने गंगेचे पूजन करावे, दीपकाने सूर्याचे पूजन करावे पुष्पांनी पृथ्वीचे पूजन करावे, तसेच भगवंताच्या वस्तूने भगवंताचीच पूजा होत आहे. वास्तविक पाहिले तर पूज्यही भगवान् आहेत, पूजेची सामुग्रीही भगवान् आहेत, पूजाही भगवान् आहे आणि पूजकही भगवान् आहेत!

लौकिक बीज शेतातून उत्पन्न होणारे असते, परंतु भगवंतरूपी अलौकिक बीज उत्पन्न होणारे नाही. म्हणून भगवंताने सातव्या अध्यायात स्वत:ला 'सनातन बीज' म्हटले—'**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्**' (७। १०). आता येथे भगवान् स्वत:ला 'अव्यय बीज' म्हणतात—'**बीजमव्ययम्**'. कारण लौकिक बीज तर अंकुर उत्पन्न करून नष्ट होते, परंतु भगवान्‌रूपी अलौकिक बीज अनंत ब्रह्मांड निर्माण करूनही जसेच्या तसे राहते, त्याच्यात किंचिन्मात्रही विकार उत्पन्न होत नाही. तात्पर्य हे आहे की, भगवान् संपूर्ण जगताच्या आरंभीही राहतात आणि अंतीही राहतात. जे आदी आणि अंती राहते तेच मध्यातही (वर्तमानातही) राहते—हा सिद्धान्त आहे. जसे अनेक प्रकारच्या वस्तू मातीपासून बनतात, मातीतच राहतात आणि शेवटी मातीतच विलीन होतात. तसेच संपूर्ण संसारातील जितकी काही बीजे आहेत ती सर्व भगवंतापासूनच उत्पन्न होतात. (गीता १० । ३९). तात्पर्य हे आहे की, सांसारिक बीजे तर उत्पन्न होऊन नष्ट होतात, परंतु भगवंतरूपी अविनाशी बीज आदी, मध्य आणि अंती जसेच्या तसे राहते. म्हणून वर्तमानात संसाररूपाने भगवान्‌च आहेत. भगवंताशिवाय काही नाही.

## तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च।
## अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन॥ १९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अर्जुन** | = हे अर्जुन! (संसाराच्या हितासाठी) | **च** | = आणि (मग त्या जलाचा) | **च** | = आणि |
| | | | | **मृत्युः** | = मृत्यू |
| **अहम्** | = मी (च) | **वर्षम्** | = (मीच) पाऊसरूपाने | **च** | = तसेच |
| **तपामि** | = सूर्यरूपाने तापतो, | | | **सत्** | = सत् |
| **अहम्** | = मी (च) | **उत्सृजामि** | = वर्षाव करतो (आणखी काय सांगू) | **च** | = व |
| **निगृह्णामि** | = जल ग्रहण करतो | | | **असत्** | = असत् (सुद्धा) |
| | | **अमृतम्** | = अमृत | **अहम्, एव** | = मीच आहे. |

*व्याख्या*—**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च**—पृथ्वीवर जे काही अशुद्ध, घाणयुक्त वस्तू आहेत, ज्यापासून रोग उत्पन्न होतात, त्यांचे शोषण करून प्राण्यांना निरोगी करण्यासाठी,† अर्थात् औषधी, कंदमूळात जो विषारी भाग असतो, त्याचे शोषण करण्यासाठी आणि पृथ्वीचा जो पाण्याचा भाग आहे, ज्यामुळे अपवित्रता होत असते ती नष्ट करण्यासाठी, मीच सूर्यरूपाने तापतो. सूर्यरूपाने त्या सर्व पाण्याच्या भागाचे शोषण करून आणि त्या पाण्याला शुद्ध तसेच गोड करून योग्य समयी पावसाच्या रूपाने प्राणी-मात्राच्या हितासाठी वर्षाव करतो, त्यामुळे सर्व प्राण्यांचे जीवन चालते.

**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन**—मीच अमृत आणि मृत्यू आहे अर्थात् सर्व जीवांचे प्राण धारण करून जिवंत राहणे (न मरणे) आणि संपूर्ण जीवांच्या शरीर व प्राण यांचा वियोग करणे, (मरणे) देखील मीच आहे.

आणखी काय सांगू, सत-असत्, नित्य-अनित्य, कार्य-

* महासर्ग-अवस्थेत संपूर्ण प्राणी ज्यात राहतात तो ''निवास'' आहे आणि महाप्रलय अवस्थेत प्रकृतीसहित संपूर्ण संसार ज्यात राहतो ते ''स्थान'' आहे. हेच निवास आणि स्थानात अंतर आहे.

† नीरोगता सूर्यापासूनच होत असते. ''आरोग्यं भास्करादिच्छेत्''. (लौगाक्षि स्मृति)

कारणरूपाने जे काही आहे ते सर्व मीच आहे. तात्पर्य जसे महात्म्यांच्या दृष्टीने सर्वकाही वासुदेवच (भगवत्स्वरूप) आहे-"**वासुदेवः सर्वम्**", तसेच भगवंताच्या दृष्टीत सत्-असत्, कारण-कार्य सर्व काही भगवंतच आहेत. परंतु सांसारिक लोकांच्या दृष्टीत सर्व काही परस्पर विरुद्ध दिसते. जसे जगणे आणि मरणे वेगवेगळे दिसते, उत्पत्ती आणि विनाश वेगवेगळा दिसतो, स्थूल आणि सूक्ष्म वेगवेगळे दिसते, सत्व, रज, तम हे तिन्ही गुण वेगवेगळे दिसतात, पाणी आणि बर्फ वेगवेगळे दिसतात. परंतु वास्तविक संसार-रूपाने भगवंतच प्रगट झाल्याने, भगवंतच बनलेले असल्यामुळे सर्व काही भगवत्स्वरूपच आहे. भगवंताशिवाय त्यांची स्वतंत्र सत्ता नाहीच. जसे सुतापासून बनविलेल्या वस्त्रात केवळ सुतच सुत असते, तसे वस्तू, व्यक्ती, क्रिया, पदार्थ इत्यादी सर्व काही केवळ भगवंतच भगवंत आहेत.

**परिशिष्ट भाव**—सृष्टीच्या पूर्वीही परमात्मा होते आणि अंतीही परमात्मा राहतील मग मध्यात दुसरा कोठून आला? म्हणून अमृतही भगवंताचे स्वरूप आहे आणि मृत्यूही भगवंताचे स्वरूप आहे. सत्‌ही (परा-प्रकृतीही) भगवंताचे स्वरूप आहे आणि असत्‌ही (अपरा-प्रकृतीही भगवंताचे स्वरूप आहे. जसे अन्नकूटाच्या प्रसादात रसगुल्ले, बुलाबजाम इत्यादीही असतात आणि मेथी, कारले इत्यादीची भाजीही असते अर्थात् गोडही भगवंताचा प्रसाद असतो आणि कडूही भगवंताचा प्रसाद असतो. तसेच जे आपल्या मनाला आवडेल तेही भगवंताचे स्वरूप आहे आणि जे आवडत नाही तेही भगवंताचे स्वरूप आहे. सूर्यरूपाने जल ग्रहण करणे आणि मग त्याचा वर्षाव करणे—ही दोन्ही विपरीत कार्यही (ग्रहण आणि त्यागही) भगवान् करतात. एवढेच नव्हे तर जलरूपाने ग्रहण केले जाणारेही भगवान् आहेत, वर्षाव होणारेही भगवान् आहेत आणि वर्षारूप क्रियाही भगवंत आहेत!

'**सदसच्चाहमर्जुन**'—संसारात सत् (परा) आणि असत् (अपरा) शिवाय दुसरे काही नाही. संसार असत् आहे आणि त्यात राहणारे परमात्मतत्त्व सत् आहे. शरीर असत् आहे आणि त्यात राहणारा जीवात्मा सत् आहे. शरीर आणि संसार परिवर्तनशील आहेत, जीवात्मा आणि परमात्मा अपरिवर्तनशील आहेत, शरीर आणि संसार नाशवान आहेत, जीवात्मा आणि परमात्मा अविनाशी आहेत (गीता २। १२). भगवान् म्हणतात की, परिवर्तनशील सुद्धा मी आहे आणि अपरिवर्तनशीलही मी आहे, नाशवानही मी आहे आणि अविनाशीही मी आहे. तात्पर्य हे आहे की सर्व काही भगवान्‌च आहेत. भगवंताशिवाय दुसरे काहीही नाही. (गीता ७। ७)

'**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**'—यात तर विवेक आहे, परंतु '**सदसच्चाहम्**'—यात विवेक नाही तर विश्वास आहे. सर्व काही भगवान्‌च आहे—हा विश्वास विवेकापेक्षाही श्रेष्ठ आहे. कारण विवेक तिथेच काम करतो जिथे सत् आणि असत् दोन्हींचा विचार आहे. जर असत् नाहीच तर मग विवेक काय करेल? असत्‌ला मानले तर विवेक आहे आणि असत्‌ला मानले नाही तर विश्वास आहे. विवेकात सत्-असत् याचा विभाग आहे परंतु विश्वासात विभाग नाहीच. विश्वासात केवळ सत्‌च सत् अर्थात् परमात्माच परमात्मा आहेत.

ज्ञानमार्गात विवेकाची आणि भक्तिमार्गात विश्वास आणि प्रेम यांची मुख्यता आहे. ज्ञानमार्गात सत्-असत्, जड-चेतन, नित्य-अनित्य इत्यादीचा विवेक मुख्य असल्याने यात 'द्वैत' आहे परंतु भक्तिमार्गात एका भगवंताचाच विश्वास मुख्य असल्याने यात 'अद्वैत' आहे. तात्पर्य हे आहे की, दोन सत्ता नसल्यामुळे वास्तविक अद्वैत भक्तीतच आहे.

ज्ञानमार्गात साधक असत्‌चा निषेध करतो. निषेध केल्यामुळे असत्‌च्या सत्तेचा भाव कायम राहू शकतो. साधक असत्‌च्या निषेधावर जेवढा जोर देतो तेवढाच असत्‌च्या सत्तेचा भाव दृढ होतो. म्हणून असत्‌चा निषेध करणे तितके चांगले नाही जितके त्याची उपेक्षा करणे चांगले आहे. उपेक्षा करण्यापेक्षाही 'सर्व काही परमात्माच आहे'—हा भाव सर्वात उत्कृष्ट आहे म्हणून भक्त असत्‌लाही हटवित नाही, असत्‌ची उपेक्षाही करीत नाही तर सत्-असत् सर्वात परमात्म्याचेच दर्शन करतो. कारण वास्तविक सर्व काही परमात्माच आहे. भगवान् म्हणतात—

**अहमेवासमेवाग्रे नान्यद् यत् सदसत् परम्।**
**पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम्॥** (श्रीमद्भा० २।९।३२)

'सृष्टीच्या पूर्वीही मीच विद्यमान होतो, माझ्याशिवाय दुसरे काही नव्हते आणि सृष्टी उत्पन्न झाल्यावर जो काही हा संसार दिसतो तोही मीच आहे. सत्-असत् आणि सत्-असत्‌च्या पलीकडे जे काही असू शकते तेही मीच आहे. सृष्टीशिवायही जे काही आहे ते मीच आहे आणि सृष्टीचा नाश झाल्यावर जे काही शिल्लक राहते तेही मीच आहे.'

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण, अहम् इत्यादी सर्व काही भगवान्‌च आहेत. जसे आपण मनाने हरिद्वारचे चिंतन केले तर हरिकी पेढी, घंटाघर इत्यादी स्थावरही मनच बनते आणि गंगाजी व त्यात पोहत असलेले मासे, स्नान करीत असलेली माणसे

इत्यादी जंगमही मनच बनते अर्थात् स्थावरही मनच झाले आणि जंगमही मनच झाले. त्याचप्रमाणे सत्‌ही भगवान्‌च आहेत आणि असत्‌ही भगवान्‌च आहेत.

सत् आणि असत्—हे दोन विभाग आपल्या दृष्टीने आहेत. म्हणूनच भगवान् आपल्याला समजाविण्यासाठी म्हणतात—'**सदसच्चाहम्**'. भगवंताच्या दृष्टीत तर एका त्यांच्याशिवाय काही नाही. उच्चाती-उच्च दार्शनिक दृष्टीने पाहिले तर सत्ता एकच आहे. दोन सत्ता होऊच शकत नाही. दुसरी सत्ता मानल्यानेच मोह होतो (गीता ७। १३). राग-द्वेषही दुसरी सत्ता मानल्यानेच होतात.

***संबंध**—जगताची रचना तसेच विविध परिवर्तन माझ्या अध्यक्षतेखालीच होत असते. परंतु माझ्या ह्या प्रभावाला न जाणून घेणारे मूर्खलोक आसुरी, राक्षसी आणि मोहिनी प्रकृतीचा आश्रय घेऊन माझी अवज्ञा करतात. म्हणून ते पतनाकडे जातात. जे भक्त माझ्या प्रभावाला जाणून घेतात, ते माझ्या दैवी गुणांचा आश्रय घेऊन अनन्यमनाने माझी निरनिराळ्या रीतीने उपासना करतात. म्हणून त्यांना सत्-असत् सर्व काही एक परमात्माच आहे—असा यथार्थ अनुभव होतो. परंतु ज्यांच्या अंत:करणात सांसारिक भोग आणि संग्रहाची कामना असते, ते वास्तविक तत्त्वाला जाणत नाहीत व भगवंताशी विमुख होऊन स्वर्गादी लोकांतील भोगांच्या प्राप्तीसाठी सकामभावनेने यज्ञादी अनुष्ठान करत असतात. म्हणून ते अवागमनाला प्राप्त होतात. याचे वर्णन भगवंत पुढील दोन श्लोकांत करत आहेत.*

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा**
**यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते।**
**ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोक-**
**मश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान्॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्रैविद्या** | = तिन्ही वेदात सांगितलेली सकाम अनुष्ठाने करणारी (आणि) | **माम्** | = (इंद्ररूपाने) माझे | | पवित्र |
| **सोमपाः** | = सोमरस पान करणारी | **इष्ट्वा** | = पूजन करून | **सुरेन्द्रलोकम्** | = इंद्रलोक |
| **पूतपापाः** | = (जी) पापरहित माणसे | **स्वर्गतिम्** | = स्वर्गप्राप्तीची | **आसाद्य** | = प्राप्त करून |
| **यज्ञैः** | = यज्ञांद्वारा | **प्रार्थयन्ते** | = प्रार्थना करतात. | **दिवि** | = (तेथे) स्वर्गातील |
| | | **ते** | = ती | **दिव्यान्,** | = देवतांच्या |
| | | **पुण्यम्** | = पुण्यांचे फलस्वरूपी | **देवभोगान्** | दिव्य भोगांना |
| | | | | **अश्नन्ति** | = भोगतात. |

*व्याख्या*—**त्रैविद्या मां सोमपाः.........दिव्यान्दिवि देवभोगान्**—संसारी माणसे बहुधा येथील भोगातच रममाण असतात. त्यातही जे विशेष बुद्धिवान् म्हणविले जातात, त्यांच्या अंत:करणातही उत्पत्ति-विनाशशील वस्तूंचे महत्त्व असल्याकारणाने, जेव्हा ते ऋक, साम आणि यजु: या तीन्ही वेदांत सांगितलेल्या सकाम कर्मांचे आणि त्यांच्या फलाचे वर्णन ऐकतात तेव्हा ते (वेदाविषयी आस्तिक-भाव असल्याकारणाने) येथील भोगांची फारशी परवा न करता स्वर्गाच्या भोगाविषयीच्या लालसेत पडतात आणि स्वर्ग प्राप्तीसाठी वेदांत सांगितलेल्या यज्ञांच्या अनुष्ठानास लागतात. अशा मनुष्यांसाठीच येथे "**त्रैविद्या:**" पद आले आहे.

सोमलता अथवा सोमवल्ली नावाची एक वेली असते. त्याच्या संबंधात शास्त्रात असा विषय येतो की, ज्याप्रमाणे शुक्लपक्षात चंद्राची एकएक कला वाढत जाऊन पौर्णिमेला पूर्ण कला होतात आणि कृष्णपक्षात प्रत्येक दिवशी एक एक कला क्षीण होऊन आमावस्येला पूर्ण कला क्षीण होतात. त्याप्रमाणे त्या सोमलतेलाही शुक्ल पक्षात प्रत्येक दिवशी एकएक पान निघत-निघत पौर्णिमेला पंधरा पाने होतात आणि कृष्णपक्षात प्रत्येक दिवशी एक एक पान गळत जाऊन आमावस्येला पूर्ण पाने गळून जातात.* त्या सोमलतेच्या रसाला सोमरस म्हणतात. यज्ञ करणारे त्या सोमरसाला वैदिक मंत्राने अभिमंत्रित करून पितात.

* पञ्चाङ्गयुक्पञ्चदशच्छदाढ्या सर्पाकृतिः शोणितपर्वदेशा। सा सोमवल्ली रसबन्धकर्म करोति एकादिवसोपनीता॥
करोति सोमवृक्षोऽपि रसबन्धवधादिकम्। पूर्णिमादिवसानीतस्तयोर्वल्ली गुणाधिका॥
कृष्णे पक्षे प्रगलति दलं प्रत्यहं चैकमेकं शुक्लेऽप्येकं प्रभवति पुनर्लम्बमाना लताः स्युः।

म्हणून त्यांना "**सोमपाः**" म्हटले गेले आहे.

वेदांत वर्णन केलेल्या यज्ञांचे अनुष्ठान करणाऱ्या आणि वेदमंत्रांनी अभिमंत्रित केलेला सोमरस पिणाऱ्या, अशा माणसांची, स्वर्गास प्रतिबंधक असणारी पापे नष्ट होतात, म्हणून त्यांना "**पूतपापा**" म्हटले गेले आहे.

भगवंतांनी पूर्व श्लोकात म्हटले आहे की, सत्-असत् सर्व काही मीच आहे. तर मग इंद्रही भगवत् स्वरूपच झाले. म्हणून येथे "**माम्**" पदाने इंद्रालाच घेतले पाहिजे. कारण सकाम यज्ञाचे अनुष्ठान करणारी माणसे स्वर्ग प्राप्तीच्या इच्छेने स्वर्गाच्या अधिपती इंद्राचेच पूजन करतात आणि इंद्राकडूनच स्वर्ग प्राप्तीची इच्छा करतात.

स्वर्गप्राप्तीच्या इच्छेने स्वर्गाचे अधिपती इंद्राची स्तुती करणे आणि त्या इंद्रापासून स्वर्गाची याचना करणे या दोन्हीचे नाव "**प्रार्थना**" आहे. वैदिक आणि पौराणिक विधी विधानाने केल्या गेलेल्या सकाम यज्ञाने इंद्राचे पूजन करणे आणि प्रार्थना करण्याचे फलस्वरूपी म्हणून ते लोक स्वर्गात जाऊन देवतांच्या दिव्य भोगांना भोगतात. ते दिव्य भोग मनुष्य लोकाच्या भोगापेक्षा फार विलक्षण असतात तेथे ते दिव्य शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—या पाचही विषयांचा भोग (अनुभव) घेतात. याशिवाय दिव्य नंदनवन इत्यादीत फिरणे, सुख-आराम घेणे, आदर-सत्कार मिळविणे, महत्त्व प्राप्त होणे इत्यादी भोगांनाही भोगतात.

**परिशिष्ट भाव**—येथे अशा माणसांचे वर्णन आले आहे ज्यांच्या अंत:करणात संसाराची सत्ता आणि महत्ता बसलेली आहे आणि जे भगवंताची अविधीपूर्वक उपासना करणारे आहेत (गीता ९ । २३). अशा माणसांच्या उपासनेचे फल नाशवानच असते (गीता ७ । २३).

समग्ररूपाच्या अंतर्गत असल्याने सर्व भगवान्‌च आहेत. म्हणून येथे इंद्रासाठीही 'माम्' पद आले आहे.

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं**
**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना**
**गतागतं कामकामा लभन्ते॥ २१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ते** | = ते | **पुण्ये** | = पुण्य | | लेल्या सकाम धर्माचा |
| **तम्** | = त्या | **क्षीणे** | = क्षीण झाल्यावर | **अनुप्रपन्नाः** | = आश्रय घेऊन |
| **विशालम्** | = विशाल | **मर्त्यलोकम्** | = मृत्युलोकात | **कामकामाः** | = भोगांची कामना |
| **स्वर्गलोकम्** | = स्वर्गलोकाच्या | **विशन्ति** | = येतात. | | करणारी माणसे |
| | (भोगांना) | **एवम्** | = अशाप्रकारे | **गतागतम्** | = आवागमनाला |
| **भुक्त्वा** | = भोगून | **त्रयीधर्मम्** | = तिन्ही वेदात सांगित- | **लभन्ते** | = प्राप्त होतात. |

***व्याख्या***—**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं........कामकामा लभन्ते**—स्वर्गलोकही विशाल (विस्तृत) आहे. तेथील आयुष्यदेखील खूप अधिक असते आणि तेथील भोग-सामुग्रीही खूप असते. म्हणून इंद्रलोकाला "विशाल" म्हटले आहे.

स्वर्गप्राप्ती इच्छिणारे भगवंताचाही आश्रय घेत नाहीत किंवा भगवत्प्राप्तीच्या साधनाचाही आश्रय घेत नाहीत. ते तर केवळ तिन्ही वेदांत सांगितलेल्या सकाम धर्माचाच (अनुष्ठान) आश्रय घेतात. म्हणून त्यांना त्रयीधर्माचे शरण म्हटले गेले आहे.

---

तस्याः कन्दः कलयतितरां पूर्णिमायां गृहीतो बद्ध्वा सूतं कनकसहितं देहलोहं विधत्ते॥
इयं सोमकला नाम वल्ली परमदुर्लभा। अनया बद्धसूतेन्द्रो लक्षवेधी प्रजायते॥ (रसेन्द्रचूडामणि ६।६-९)

ज्याची पंधरा पाने असतात, ज्याची आकृती सर्पाप्रमाणे असते, जेथून पाने निघतात, त्या गाठी लाल असतात, अशी ती पौर्णिमेच्या दिवशी आणलेली पंचांगाने (मूळ, दांडी, पान, फूल व फळ) युक्त सोमवल्ली पाऱ्याला स्तंभित करते. पौर्णिमेच्या दिवशी आणलेला पाच अंगाने (मूळ, साल, पाने, फूल आणि फळ) युक्त सोमवृक्षही पाऱ्याला बद्धकरून टाकणे, पाऱ्याचे भस्म करून टाकणे इत्यादी कार्य करत असतो. परंतु सोमवल्ली आणि सोमवृक्ष या दोन्हीपैकी सोमवल्ली अधिक गुणयुक्त असते. या सोमवल्लीचे कृष्णपक्षात प्रत्येक दिवशी एक एक पान गळून जाते आणि शुक्लपक्षात पुन्हा प्रत्येक दिवशी एक एक पान उगवते. याप्रमाणे ही लता वाढत राहते. पौर्णिमेच्या दिवशी या लतेचा कंद काढला तर तो फार श्रेष्ठ असतो. धोतऱ्याचे फळ आणि पारा या कंदात घालून वापरला तर शरीर लेखंडाप्रमाणे कणखर बनते. यात बांधलेला पारा लक्षवेधी होतो अर्थात् एकपट बद्ध पारा लाखपट लोखंडाचे सोने बनवून देतो. ही सोमवल्ली नावाची लता अत्यंत दुर्लभ आहे.

**गतागतम्**—याचा अर्थ जाणे आणि येणे असा आहे. सकाम अनुष्ठान करणारे स्वर्गाला प्राप्त करून देणाऱ्या ज्या पुण्याच्या बळावर स्वर्गात जातात, ते पुण्य समाप्त होताच ते पुन्हा मृत्युलोकात परत येतात. अशा प्रकारे रहाटगाडग्या-प्रमाणे पुन्हा पुन्हा सकाम शुभ कर्म करून स्वर्गात जाणे आणि पुन्हा मृत्युलोकात येणे असे चक्र चालूच राहते. या चक्रातून ते कधी सुटूच शकत नाहीत.

जर पूर्व श्लोकात आलेल्या ''**पूतपापाः**'' पदाने संपूर्ण पाप नष्ट झाले आहेत आणि येथे आलेले ''**क्षीणे पुण्ये**'' पदाने ज्यांचे संपूर्ण पुण्य क्षीण झाले आहेत—असा अर्थ घेतला तर ते (पाप-पुण्य दोन्ही क्षीण झाल्याने) मुक्त व्हावयास पाहिजे होते. परंतु ते मुक्त होत नाहीत, तर अवागमनाला प्राप्त होतात. म्हणून येथे ''**पूतपापाः**'' पदाने ते घेतले गेले आहेत, ज्यांचे स्वर्ग प्रतिबंधक पाप यज्ञ करण्याने नष्ट झाले आहेत आणि ''**क्षीणे पुण्ये**'' पदांनी ते घेतले गेले आहेत, ज्यांचे स्वर्गप्रापक पुण्य तेथील सुख भोगल्याने समाप्त झाले आहे. म्हणून संपूर्ण पुण्य आणि पाप यांच्या नाशासंबंधी येथे बोलले गेले नाही.

***संबंध***—*जे त्रयी धर्माचा आश्रय घेतात, त्यांना तर देवतांची प्रार्थना, याचना करावी लागते, परंतु जे केवळ माझाच आश्रय घेतात, त्यांना आपल्या योगक्षेमासाठी मनात चिंता, संकल्प अथवा याचना करावी लागत नाही. ही गोष्ट भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।
## तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥ २२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ये** | = जे | | चांगल्याप्रकारे | **योगक्षेमम्** | = योगक्षेम |
| **अनन्याः** | = अनन्य | | उपासना करतात, | | (अप्राप्ताची |
| **जनाः** | = भक्त | **नित्याभि-** | = (माझ्यात) | | प्राप्ती आणि |
| **माम्** | = माझे | **युक्तानाम्** | निरंतर | | प्राप्ताचे रक्षण) |
| **चिन्तयन्तः** | = चिंतन करीत | | लागलेल्या | **अहम्** | = मी |
| **पर्युपासते** | = (माझी) | **तेषाम्** | = त्या भक्तांचा | **वहामि** | = वहन करतो. |

*व्याख्या*— **अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते**—जे काही पाहणे, ऐकणे आणि समजण्यात येत आहे, ते सर्वचे सर्व भगवंताचे स्वरूपच आहे आणि त्यात जे परिवर्तन तसेच क्रिया होत आहे ती सर्वची सर्व भगवंताची लीला आहे—असे जे दृढतेने मानतात, समजतात त्यांची मग भगवंताशिवाय कुठेही महत्त्वबुद्धी राहत नाही. ते भगवंताचे ठिकाणीच मग्न असतात. म्हणून ते ''अनन्य'' आहेत. केवळ भगवंताविषयीच महत्ता आणि प्रियता असल्यामुळे त्यांच्याकडून आपोआप भगवंताचे चिंतन होत असते.

''**अनन्याः**'' म्हणण्याचा दुसरा भाव असा आहे की, त्यांचे साधन आणि साध्य केवळ भगवंतच असतात. अर्थात् केवळ भगवंतालाच शरण जायचे आहे, त्यांचेच चिंतन करायचे आहे, त्यांचीच उपासना करायची आहे, त्यांनाच प्राप्त करून घ्यायचे आहे—असा त्यांचा दृढ भाव असतो. भगवंताशिवाय इतर कोणाविषयी भाव नसतोच, कारण भगवंताशिवाय इतर सर्व नाशवान् आहे. म्हणून त्यांच्या मनात भगवंताशिवाय इतर कोणतीही इच्छा नसते, आपल्या जीवन-निर्वाहाचीही इच्छा नसते, म्हणून ते अनन्य आहेत.

ते खाणे-पिणे, चालणे-फिरणे, बोलणे-चालणे, व्यवहार करणे इत्यादी जी काही कामे करत असतात, ती सर्व भगवंताची उपासना आहे. कारण ते सर्व काम भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच करत असतात.

**तेषां नित्याभियुक्तानाम्**—जो अनन्य होऊन भगवंताचे चिंतन करत असतो आणि भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच सर्व कामे करत असतो, त्यांच्यासाठीच येथे ''**नित्याभियुक्तानाम्**'' पद आले आहे.

ह्याला दुसऱ्या शब्दात असे समजा की, ते संसाराशी विन्मुख झाले—ही त्यांची ''अनन्यता'' आहे. ते केवळ भगवंताला सम्मुख झाले—हे त्यांचे ''चिंतन'' आहे आणि सक्रिय-अक्रिय सर्व अवस्थेत भगवत्सेवा परायण झाले—ही त्यांची ''उपासना'' आहे. ह्या तीन्ही गोष्टी ज्यांचे ठिकाणी असतात ते ''नित्याभियुक्त'' असतात.

**योगक्षेमं वहाम्यहम्**—अप्राप्त वस्तूची प्राप्ती करवून देणे ''योग'' आहे आणि प्राप्त सामुग्रीचे रक्षण करणे ''क्षेम'' आहे. भगवान् म्हणतात की, माझ्या ठिकाणी नित्य-निरंतर मग्न असलेल्या भक्तांचा योगक्षेम मी चालवतो.

वास्तविक पहिले तर, अप्राप्त वस्तूची प्राप्ती करवून देण्यातही ''योग'' चालवणे आहे आणि प्राप्ती न करवून देण्यातही ''योग'' चालवणे आहे. कारण भगवान तर आपल्या भक्ताचे हित पाहतात आणि तेच काम करतात, ज्यात भक्ताचे हित होत असेल! त्याचप्रमाणे प्राप्त वस्तूचे रक्षण करण्यातही ''क्षेम'' चालवणे आहे आणि रक्षण न करण्यातही ''क्षेम'' चालवणे आहे. जर भक्ताची भक्ती वाढत असेल, त्याचे कल्याण होत असेल तर भगवान् प्राप्ताचे रक्षण करतील, कारण त्यातच त्याचे ''क्षेम'' असते. जर प्राप्ताचे रक्षण करण्याने त्याची भक्ती वाढत नसेल, त्याचे हित होत नसेल, तर भगवान् त्या प्राप्त वस्तूला नष्ट करतील. कारण नष्ट करण्यातच त्याचे ''क्षेम'' असते. म्हणून भगवंताचे भक्त अनुकूल आणि प्रतिकूल दोन्ही परिस्थितीत परम प्रसन्न राहतात. भगवंतावर निर्भर राहिल्याने, त्यांचा असा दृढ विश्वास होतो की, जी कोणती परिस्थिती येत असते ती भगवंतानेच पाठवलेली असते. म्हणून ''अनुकूल परिस्थिती योग्य आहे आणि प्रतिकूल परिस्थिती अयोग्य आहे.'' त्यांचा असा भाव समाप्त होतो. त्यांचा असा भाव राहतो की, ''भगवंतांनी जे केले आहे ते योग्य आहे आणि भगवंतांनी जे केले नाही तेही योग्य आहे. त्यातच आमचे कल्याण आहे.''

''असे झाले पाहिजे आणि असे होऊ नये'' असा विचार करण्याची आपल्याला किंचितमात्रही आवश्यकता नाही. कारण आपण नित्य भगवंताच्या हातामध्येच आहोत आणि भगवान् नेहमीच आपले वास्तविक हित करत असतात. म्हणून आपले अहित कधी होऊच शकत नाही. तात्पर्य, भक्ताच्या मनाप्रमाणे झाले तर त्यातही कल्याण आहे आणि मनाप्रमाणे न झाले तरी त्यातही कल्याण आहे. भक्ताच्या इच्छेला आणि अनिच्छेला काही किंमत नसते. भगवंताच्या विधानाला किंमत असते. म्हणून जर कोणी अनुकूलतेत प्रसन्न आणि प्रतिकूलतेत खिन्न होत असेल, तर तो भगवंताचा दास नव्हे, तर आपल्या मनाचा दास आहे.

वास्तविक तर ''योग'' भगवंताच्या संबंधाला म्हणतात आणि ''क्षेम'' जीवाच्या कल्याणाला म्हणतात. या दृष्टीने भगवान् भक्ताच्या संबंधाला आपल्याशी दृढ करतात—हा तर भक्ताचा ''योग'' झाला आणि भक्ताच्या कल्याणविषयी प्रयत्न करतात—हे भक्ताचे ''क्षेम'' झाले. याच विषयाला अनुसरून दुसऱ्या अध्यायाच्या पंचेचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला आज्ञा दिली की, ''तू निर्योगक्षेम होऊन जा'' अर्थात् तू योग आणि क्षेमसंबंधी कोणत्याही प्रकारची चिंता करू नको.

''**वहाम्यहम्**'' चे तात्पर्य जसे लहान मुलासाठी आई एखाद्या वस्तूची आवश्यकता समजते तेव्हा ती मोठ्या प्रसन्नतेने आणि उत्साहाने स्वतः ती वस्तू आणून देते. तसेच माझ्यात निरंतर मग्न झालेल्या भक्तासाठी एखाद्या वस्तूची आवश्यकता मला वाटली तर ती वस्तू मी स्वतः वाहून आणतो अर्थात् भक्तांचे सर्व काम मी स्वतः करतो.

**परिशिष्ट भाव**—भगवान् येथे पूर्व श्लोकात वर्णित वैदिक सकाम माणसे आणि पुढील श्लोकात वर्णित अन्य देवतांच्या उपासकांपेक्षा आपल्या भक्तांची विशेषता वर्णन करतात. भगवंताचे अनन्यभक्त तर पूर्व श्लोकात वर्णित स्वर्गलोकालाही (इंद्रलोकालाही) मानत नाहीत आणि पुढील श्लोकात वर्णित अन्य देवतांनाही मानत नाहीत. इंद्रादीची उपासना करणाऱ्यांना तर कामनेनुसार सीमित फल प्राप्त होते. परंतु भगवंताची उपासना करणाऱ्यांना असीम फल प्राप्त होते. देवतांचा उपासक तर मजूरासारखा (नोकरासारखा) आहे आणि भगवंताचा उपासक घरातील सदस्यासारखा आहे. मजूराने काम केले तर त्याला मजूरीनुसार पैसे मिळतात परंतु घरातील सदस्याने काम केले तर सर्व काहीं त्याचेच होते.

अनन्यभक्त ते आहेत ज्यांच्या दृष्टीत एका भगवंताशिवाय दुसऱ्याची सत्ताच नसते ***'उत्तम के अस बस मन माहीं। सपनेहुँ आन पुरुष जग नाहीं॥'*** (मानस अरण्य ५।६).

**'योगक्षेमं वहाम्यहम्'**—भगवान् साधकाला त्याच्यासाठी आवश्यक असलेली साधन सामुग्री प्राप्त करून देतात आणि प्राप्त असलेल्या साधन सामुग्रीचे रक्षण करतात—हेच भगवंताचे योगक्षेम वहन करणे आहे. जरी भगवान् सर्व साधकांचा योगक्षेम वहन करतात तरी अनन्यभक्तांचा योगक्षेम विशेषरूपाने वहन करतात. जसे आवडत्या मुलाचे पालन माता स्वतः करते, नोकराकडून करवित नाही.

जसे भक्ताला भगवंताच्या सेवेत आनंद येतो, तसेच भगवंतालाही भक्ताच्या सेवेत आनंद येतो—**'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्'** (गीता ४।११).

***संबंध***—*पूर्वश्लोकात आपल्या उपासनेची गोष्ट सांगून आता भगवान् अन्य देवतांच्या उपासनेविषयी सांगतात.*

**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः।**
**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्॥ २३॥**

**कौन्तेय** = हे कुन्तीनंदन! **ये** = जे **अपि** = कोणी **भक्ताः** = भक्त (माणसे) **श्रद्धया, अन्विताः** = श्रद्धापूर्वक **अन्य देवताः** = अन्य देवतांचे **यजन्ते** = पूजन करतात **ते, अपि** = तेही **माम, एव** = माझेच **यजन्ति** = पूजन करतात, **अविधिपूर्वकम्** = (परंतु करतात) अविधीपूर्वक अर्थात् देवतांना माझ्याहून वेगळे मानतात.

*व्याख्या*—**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः**—देवतांच्या ज्या भक्तांना "सर्व काही मीच आहे" (**सदसच्चाहम्** ९।१९) हे समजले नाही आणि ज्यांची श्रद्धा इतर देवतेवर असते, ते त्या देवतेचीच श्रद्धेने पूजा करतात. ते देवतांना माझ्यापासून वेगळे आणि श्रेष्ठ मानून आपापल्या श्रद्धा भक्तिनुसार आपापल्या इष्ट देवतांच्या नियमांना धारण करतात. या देवतेच्या कृपेनेच आपल्याला सर्व काही मिळेल. असे समजून नित्य-निरंतर देवतांच्या सेवा पूजेतच व्यस्त राहतात.

**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्**—देवतांचे पूजन करणारे वास्तविक माझेच पूजन करत असतात, कारण तत्त्वदृष्टीने माझ्याशिवाय दुसरे काही नाहीच. माझ्यापासून वेगळी त्या देवतांची सत्ताच नाही. ती माझीच स्वरूपे आहेत म्हणून त्यांच्याकडून केले गेलेले देवतांचे पूजनही वास्तविक माझेच पूजन आहे, परंतु आहे अविधिपूर्वक!—अविधिपूर्वक म्हणण्याचा अर्थ हा नव्हे की, पूजन-सामुग्री कशी असावी? त्यांचे मंत्र कसे असावेत? त्यांचे पूजन कसे केले जावे? इत्यादी इत्यादी विधींचे त्यांना ज्ञान नसते. याचा अर्थ असा आहे की, मला त्या देवतेपेक्षा वेगळे समजणे. जसे कामनेमुळे ज्ञान झाकले गेले असल्याने ते देवतांना शरण जातात (७।२०) तसेच येथे माझ्याहून वेगळी अशी देवतांची स्वतंत्र सत्ता मानून जे देवतांचे पूजन करणे आहे, हेच अविधिपूर्वक पूजन करणे आहे.

ह्या श्लोकाचा निष्कर्ष असा निघाला की, (१) आपल्या ठिकाणी थोडीही कामना नसावी आणि उपास्यामध्ये भगवत्‌बुद्धी असावी तर आपापल्या रुचीनुसार कोण्याही प्राण्याला, मनुष्याला आणि कोण्याही देवतांना आपले उपास्य मानून त्याची पूजा केली गेली, तर ते सर्व भगवंताचेच पूजन होईल आणि त्याचे फल भगवंताची प्राप्ती होईल आणि (२) आपल्यात किंचित्‌मात्र कामना असली आणि उपास्यरूपात साक्षात् भगवान् असले तर तो अर्थार्थी, आर्त इत्यादी भक्तांच्या श्रेणीत बसेल, ज्यांना भगवंतांनी उदार म्हटले आहे (७।१८)

वास्तविक सर्व काही भगवंतच आहेत. म्हणून ज्या कोणाची उपासना केली जाईल, सेवा केली जाईल, हित केले जाईल ती प्रकारांतराने भगवंताचीच उपासना आहे. जसे आकाशापासून झालेला पाण्याचा वर्षाव नदी, नाला, झरा इत्यादीच्या रूपाने शेवटी समुद्रालाच प्राप्त होत असतो (कारण ते पाणी समुद्राचेच आहे). त्याचप्रमाणे मनुष्य ज्या कोणाचे पूजन करेल ते तत्त्वदृष्टीने भगवतांचेच पूजन होत असते* परंतु पूजकाला लाभ तर आपापल्या भावनेनुसारच होत असतो.

**परिशिष्ट भाव**—**'त्रैविद्या माम्'** (९। २०), **'अनन्याश्चिन्तयन्तो माम्'** (९। २२) आणि **'तेऽपि मामेव'** (९। २३)—तिन्ही ठिकाणी भगवंतासाठी **'माम्'** शब्द देण्याचे तात्पर्य हे आहे की, सर्व काही भगवंतच आहेत, म्हणून भगवान् सर्वांना आपलेच स्वरूप जाणतात. जर मनुष्यात कामना नसेल आणि सर्वात भगवद्‌बुद्धी असेल तर त्याने कोणाचीही उपासना केली तरी उपासना वास्तविक भगवंताचीच आहे. तात्पर्य हे आहे की, जर निष्कामभाव आणि भगवद्‌बुद्धी झाली तर त्याचे पूजन अविधीपूर्वक राहणार नाही, तर ते पूजन भगवंताचेच होईल.

सातव्या अध्यायात **'देवयज्ञः'** पद आले होते (७। २३) त्यालाच येथे **'यजन्ते'** पदाने म्हटले गेले आहे.

***संबंध***—*देवतांचे पूजन करणाऱ्यांचे अविधिपूर्वक पूजन करणे म्हणजे काय? यावर सांगतात.*

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते॥ २४॥**

* आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम्। सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति॥ (लौगाक्षि स्मृति)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = कारण | **अहम्, एव** | = मीच आहे; | **अभिजानन्ति** | = जाणत |
| **सर्व यज्ञानाम्** | = संपूर्ण यज्ञांचा | **तु** | = परंतु | **न** | = नाहीत, |
| **भोक्ता** | = भोक्ता | **ते** | = ते | **अतः** | = त्यामुळेच |
| **च** | = आणि | **माम्** | = मला | **च्यवन्ति** | = त्यांचे पतन होते. |
| **प्रभुः, च** | = स्वामीही | **तत्त्वेन** | = तत्त्वाने | | |

*व्याख्या*— [दुसऱ्या अध्यायात भगवंतांनी म्हटले आहे की, जे भोग आणि ऐश्वर्यात अत्यंत आसक्त आहेत ते ''मला तर केवळ भगवंताकडेच वाटचाल करावयाची आहे'' असा निश्चय करू शकत नाहीत. (२।४४) म्हणून परमात्म्याकडे सम्मुख होण्यात दोन बाधा मुख्य आहेत—आपल्याला भोगांचा भोक्ता मानणे आणि आपल्याला संग्रहाचे मालक समजणे. या दोन्हीपासूनच मनुष्याची बुद्धी उलटी होते. ज्यामुळे तो परमात्म्यापासून संपूर्णपणे विमुख होतो. जसा बालपणी बालक आईशिवाय राहू शकत नाही, परंतु मोठा झाल्यावर जेव्हा त्याचा विवाह होतो तेव्हा तो स्त्रीशी ''माझी स्त्री आहे'' असा संबंध जोडून तिचा भोक्ता आणि मालक होतो. मग त्याला आई तितकी चांगली वाटत नाही, आवडत नाही. त्याच प्रमाणे जेव्हा हा जीव भोग आणि ऐश्वर्यात मग्न होतो, अर्थात् आपल्याला भोक्ता आणि संग्रहाचा मालक समजून त्याचा दास होतो आणि भगवंतापासून संपूर्णपणे विमुख होतो, तर मग त्याला ही गोष्ट स्मरणातच राहत नाही की, सर्वांचे भोक्ते आणि मालक भगवान् आहेत, यामुळेच त्याचे पतन होते. परंतु जेव्हा हा जीव जागृत होतो की, वास्तविक संपूर्ण भोगांचे भोक्ते आणि संपूर्ण ऐश्वर्याचे मालक भगवानच आहेत; तर मग तो भगवद्भक्तीला लागतो, सरळ रस्त्यावर येतो. मग त्याचे पतन होत नाही.]

**अहं हि सर्वयज्ञानां* भोक्ता च प्रभुरेव च—** शास्त्राज्ञानुसार मनुष्य यज्ञ, दान, तप, तीर्थ, इत्यादी जितकी शुभ कर्मे शास्त्राज्ञेनुसार करतात, तसेच आपल्या वर्णाश्रमाच्या मर्यादेनुसार जितकी व्यावहारिक आणि शारीरिक कर्तव्यकर्म करतात, त्या सर्व कर्मांचा भोक्ता अर्थात् फलभागी मी आहे. कारण वेदांत, शास्त्रांत, पुराणांत, स्मृतिग्रंथांत, प्राण्यांसाठी शुभ कर्मांचे जे विधान केले गेले आहे, ते विधान सर्व मीच बनवलेले आहे आणि मला देण्यासाठीच बनविले आहे, ज्यामुळे हे प्राणी संपूर्ण कर्तव्यकर्मापासून आणि त्यांच्या फलापासून संपूर्णपणे निर्लिप्त रहावेत, कधी आपल्या स्वरूपापासून ते च्युत होऊ नयेत आणि अनन्यभावाने केवळ माझ्याच भक्तिमार्गात लागून रहावेत. म्हणून त्या संपूर्ण शुभ कर्मांचा आणि व्यावहारिक तसेच शारीरिक कर्तव्यकर्मांचा भोक्ता मीच आहे.

जसे संपूर्ण यज्ञांचा भोक्ता (फलभागी) मीच आहे, तसेच संपूर्ण संसाराचा अर्थात् संपूर्ण लोक, पदार्थ, व्यक्ती, घटना परिस्थिती क्रिया आणि प्राण्यांचे शरीर, मन, बुद्धी, इंद्रिये इत्यादीचा मालकही मीच आहे. कारण आपल्या प्रसन्नतेसाठीच मी आपल्यातूनच या संपूर्ण सृष्टीची रचना केली आहे. म्हणून या सर्वांची रचना करणारा असल्याने यांचा मालक मीच आहे.

## विशेष गोष्ट

भगवंताचे भोक्ता बनणे म्हणजे काय आहे?

भगवंतांनी म्हटले आहे की, महात्म्यांच्या दृष्टीत सर्व काही वासुदेवच आहे (७।१९) आणि माझ्या दृष्टीतही सत्-असत् सर्व काही मीच आहे. (९।१९) जर सर्व काही मीच आहे तर जो कोणी ज्या देवतेच्या पुष्टीसाठी यज्ञ करतो, त्या यज्ञाद्वारा देवतारूपात माझीच पुष्टी होत असते. जो कोणी एखाद्याला दान देत असेल तर, ते दान घेणाऱ्याच्या रूपात माझाच अभाव दूर होत असतो, त्यामुळे माझीच साहाय्यता होते. कोणी तप करत असेल तर, त्या तपाने तपस्वीच्या रूपात मलाच सुख शांती मिळत असते. कोणी एखाद्याला भोजन घालीत असेल तर, त्या भोजनाने प्राणाच्या रूपात माझीच तृप्ती होत असते. कोणी शौच स्नान करतो तर त्यामुळे त्या मनुष्याच्या रूपात मलाच प्रसन्नता होते, कोणी रोपांना, झाडांना खत आणि पाणी देतो तर ते खत आणि पाणी झाड आणि रोपट्याच्या रूपात मलाच मिळते आणि त्यामुळे माझीच पुष्टी होते. कोणी एखाद्या दीन-दुःखी, रोगी यांची तन, मन, धनाने सेवा करतो, तर ती सेवा माझीच होते, कोणी एखादा वैद्य डॉक्टर एखाद्या रोग्याचा इलाज करतो तर, तो इलाज माझाच होतो. कोणी

* येथे बहुवचन ''यज्ञानाम्'' शब्दाच्या अंतर्गत संपूर्ण कर्तव्यकर्म येतात तरी पण याच्याबरोबर ''सर्व'' शब्द लावण्याचे तात्पर्य शास्त्रीय, शारीरिक, व्यावहारिक इत्यादी कोणतेही कर्तव्यकर्म बाकी राहू नये.

कुत्र्याला भाकरीचा तुकडा टाकतो, कबूतरांना दाणे टाकतो, गायींची सेवा करतो, भुकेल्याला अन्न देतो, तहानेल्याला पाणी पाजतो, तर त्या सर्व रूपात माझीच सेवा होत असते. त्या सर्व वस्तूंना मी ग्रहण करत असतो.* जसे कोणी एखाद्या मनुष्याची सेवा करतो, त्याच्या एखाद्या अंगाची सेवा करतो. त्याच्या कुटुंबाची सेवा करतो तर ती सर्व सेवा त्या मनुष्याचीच होत असते. तसेच मनुष्य ज्याची ज्याची सेवा करेल, ज्याची ज्याची साहाय्यता करेल, ती सेवा आणि साहाय्यता मलाच मिळत असते. कारण माझ्याशिवाय दुसरे कोणी नाहीच. मीच अनेक रूपात प्रगट झालो आहे "**बहु स्यां प्रजायेय**" (तैत्तिरीय० २। ६) तात्पर्य, अनेक रूपांत सर्व काही ग्रहण करणे हेच भगवंताचे भोक्ता बनणे आहे.

भगवंताचे मालक बनणे म्हणजे काय?

भगवत्तत्त्वाला जाणून घेणाऱ्या भक्तांच्या दृष्टीत अपरा आणि परा प्रकृतिरूपी संपूर्ण संसाराचे मालक भगवानच आहेत. संपूर्ण संसारावर त्यांचाच अधिकार आहे. सृष्टीची रचना करोत अथवा न करोत, संसाराची स्थिती ठेवोत अथवा न ठेवोत, प्रलय करोत अथवा न करोत, प्राण्यांना वाटेल तेथे ठेवोत, त्यांचे वाटेल तसे संचालन करोत, त्यांचा वाटेल तसा उपभोग करोत, आपल्या मर्जीनुसार वाटेल तसे परिवर्तन करोत, इत्यादी संपूर्ण परिवर्तन-परिवर्धन करण्यात भगवंत पूर्ण स्वतंत्र आहेत. तात्पर्य, जसा भोगी पुरुष भोग आणि संग्रहाचा वाटेल तसा उपभोग करण्यात स्वतंत्र आहे (परंतु त्याची स्वतंत्रता मानलेली आहे वास्तविक नव्हे) तसेच भगवान् संपूर्ण संसाराचे परिवर्तन-परिवर्धन करण्यात संपूर्णपणे स्वतंत्र आहेत. भगवंताची ही स्वतंत्रता वास्तविक आहे. हेच भगवंताचे मालक बनणे आहे.

**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते—** वास्तविक सत्-असत्, जड-चेतन इत्यादी सर्व काही मीच आहे. म्हणून जी काही कर्तव्यकर्म केली जातात त्या कर्मांचा आणि त्यांच्या फलांचा भोक्ता मीच आहे. तसेच संपूर्ण सामुग्रीचा मालकही मीच आहे. परंतु जी माणसे या तत्त्वाला जाणून घेत नाहीत ती तर असेच समजतात की, आपण ज्या कोणाला जे काही देतो, जेवू घालतो, पाणी पाजतो, ते सर्व त्या त्या प्राण्यालाच मिळते. जसे—आपण यज्ञ करतो तर यज्ञाचे भोक्ते देवता बनतात, दान देतो तर दानाचा भोक्ता तो घेणारा होतो, कुत्र्याला भाकरी आणि गायीला चारा टाकतो तर त्या भाकरीचे आणि चाऱ्याचे भोक्ता कुत्रा आणि गाय बनतात, आपण भोजन करतो तर भोजनाचे भोक्ते आपण स्वत: बनतो इत्यादी इत्यादी. तात्पर्य, ते सर्व रूपात मला न मानता इतरानांच मानतात, त्यामुळे त्यांचे पतन होते. म्हणून मनुष्याने इतर कोणाला भोक्ता आणि मालक न मानता केवळ मलाच भोक्ता आणि मालक मानावे अर्थात् जी काही वस्तू दिली जाते तिला माझीच समजून मला अर्पण करावी. "**त्वदीयं वस्तु गोविन्द तुभ्यमेव समर्पये**"

दुसरा भाव असा आहे की, मनुष्याजवळ जे काही भोग आणि ऐश्वर्य आहे ते सर्व माझेच आहे आणि माझ्या विराट्‌रूपी संसाराच्या सेवेसाठीच आहे. परंतु भोग आणि ऐश्वर्यात आसक्त असलेली माणसे त्या तत्त्वाला न जाणून घेतल्यामुळे, त्या भोगाला आणि ऐश्वर्याला आपले आणि आपल्यासाठी मानतात; ज्यामुळे ते हेच समजतात की, या सर्व वस्तू आपल्या उपभोगात येणाऱ्या आहेत आणि आपण त्यांचे अधिपती आणि मालक आहोत. परंतु वास्तविक ते वस्तुंचे गुलाम होतात. ते जितके त्या वस्तूंना आपले आणि आपल्यासाठी मानतात तितकेच त्यांच्या पराधीन होतात. मग ते त्या वस्तूंच्या चांगल्या-वाईट स्थितीला आपली चांगली-वाईट स्थिती मानतात. म्हणून त्यांचे पतन होते. तात्पर्य, मला संपूर्ण यज्ञांचा भोक्ता आणि मालक जाणून घेतल्याने मुक्ती मिळते आणि असे जाणून न घेतल्याने पतन होते.

"**च्यवन्ति**" पदाचे तात्पर्य भगवंताला प्राप्त करून न घेतल्याने त्यांचे पतन होते. ते शुभ कर्म करून जरी ते उच्च लोकांत गेले तरी, ते त्यांचे पतन आहे.कारण तेथून त्यांना पुन्हा परत यावेच लागते (९।२१) ते अवागमनाला प्राप्त होतच राहतात, मुक्त होऊ शकत नाहीत.

* एक कथा ऐकली आहे की एक वेळ श्री नामदेवजी महाराज तीर्थ यात्रेला गेले होते. वाटेत त्यांनी एका ठिकाणी झाडाखाली स्वयंपाक केला आणि तूप आणण्यासाठी मागे वळले इतक्यात एक कुत्रा येऊन तोंडात पोळी घेऊन पळाला. जेव्हा नामदेव महाराजांनी पाहिले की, कुत्रा पोळी घेऊन पळत आहे तर तेही हातात तुपाचे पात्र घेऊन त्याच्या पाठीमागे धावत म्हणाले "हे देवा! आपल्यालाच तर नैवेद्य दाखवायचा आहे तर कोरडी पोळी घेऊन का पळत आहात? पोळीला थोडे तूप तर लावू द्या." नामदेवांनी असे म्हणताच कुत्र्यतून भगवान् प्रगट झाले. कुत्र्यात भगवंताशिवाय दुसरे होतेच कोण? नामदेवांनी ओळखले. तेव्हा ते प्रगट झाले. अशा प्रकारे प्राणीमात्रात तत्त्वाने भगवंतच आहेत. म्हणून ज्या कोणाला जे काही दिले जाते ते भगवंतालाच मिळत असते.

**परिशिष्ट भाव**—पाचव्या अध्यायाच्या अंतीही भगवंताने स्वत:ला संपूर्ण यज्ञांचा आणि तपांचा भोक्ता सांगितले आहे—'**भोक्तारं यज्ञतपसाम्**' (५। २९). त्या ठिकाणी तर भगवंताने अन्वय रीतीने स्वत:ला संपूर्ण यज्ञांचा भोक्ता असलेले जाणणाऱ्यांना शांती प्राप्त होते असे म्हटले आहे आणि तेथे व्यतिरेक पद्धतीने तसे न जाणणाऱ्यांचे पतन होते असे म्हटले आहे. स्व भोक्ता बनल्यानेच पतन होते. भगवंताला संपूर्ण शुभ कर्मांचा भोक्ता मानल्याने आपल्यात भोक्तेपणा अथवा भोगेच्छा राहत नाही. भोगेच्छा न राहिल्यामुळे शांती प्राप्त होते.

वास्तविक संपूर्ण कर्मांचे महाकर्ता आणि महाभोक्ता भगवानच आहेत. परंतु कर्ताभोक्ता असूनही भगवान् वास्तविक निर्लिप्तच आहेत अर्थात् त्यांच्यात कर्तृत्व-भोक्तृत्व नाही—'**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्**' (गीता ४। १३) '**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा**' (गीता ४। १४).

***संबंध***—*जे भगवंताना संपूर्ण यज्ञांचा भोक्ता आणि मालक न मानता देवता इत्यादीचे सकामभावनेने पूजन करतात, त्यांच्या गतीचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

**यान्ति देवव्रता देवान्पितॄन्यान्ति पितृव्रताः।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम्॥ २५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **देवव्रताः** | = (सकामभावाने) देवतांचे पूजन करणारे (मृत्यूनंतर) | **पितृव्रताः** | = पितरांचे पूजन करणारे | **भूतानि** | = भूत-प्रेतांना |
| **देवान्** | = देवतांना | **पितॄन्** | = पितरांना | **यान्ति** | = प्राप्त होतात. |
| **यान्ति** | = प्राप्त होतात. | **यान्ति** | = प्राप्त होतात | **मद्याजिनः** | = (परंतु) माझे पूजन करणारे |
| | | **भूतेज्याः** | = भूत-प्रेतांचे पूजन करणारे | **माम्, अपि** | = मलाच |
| | | | | **यान्ति** | = प्राप्त होतात. |

***व्याख्या***— [पूर्व श्लोकात भगवंतांनी हे सांगितले की, मीच संपूर्ण यज्ञांचा भोक्ता आणि संपूर्ण संसाराचा मालक आहे. परंतु जी माणसे मला भोक्ता आणि मालक न मानता स्वत: भोक्ता आणि मालक बनतात. त्यांच्या पतनाचे विवेचन करतात.]

**यान्ति देवव्रता देवान्**—भगवंताना योग्य रीतीने जाणून न घेतल्यामुळे भोग आणि ऐश्वर्य इच्छिणारे पुरुष वेद आणि शास्त्रात वर्णित नियम, व्रत, मंत्र, पूजन-विधी इत्यादीनुसार आपापल्या उपास्य देवतांचे विधि-विधानाने सांगोपांग पूजन करतात, अनुष्ठान करतात आणि संपूर्णपणे त्या देवतांचे परायण होतात (७। २०). त्या उपास्य देवता आपल्या त्या भक्तांना अधिकाती अधिक आणि श्रेष्ठाती श्रेष्ठ फल हेच देतील की, त्यांना आपापल्या लोकात घेऊन जातील, ज्या लोकांना भगवंतांनी पुनरावर्ती म्हटले आहे.(८। १६)

तेवीसाव्या श्लोकात भगवंतांनी सांगितले की, देवतांचे पूजनही माझेच पूजन आहे, परंतु ते पूजन अविधिपूर्वक असते. त्या पूजनात विधिरहितपणा हा आहे की, ''सर्व काही भगवंतच आहेत'' ह्या तत्त्वाला ते जाणत नाहीत, मानत नाहीत. तसेच देवता इत्यादीचे पूजन करून भोग आणि ऐश्वर्याची इच्छा करतात. त्यामुळे त्यांचे पतन होते. जर त्यांनी देवता इत्यादिंच्या रूपात मलाच मानले असते आणि त्या भगवत्स्वरूप देवताकडून कशाचीच इच्छा केली नसती, तर त्या देवता अथवा स्वत: मीही त्यांना काही देऊ इच्छिले असते तर तेही असे म्हणाले असते की, ''हे प्रभो! आपण आमचे आहात आणि आम्ही आपले आहोत—आपल्याशी या आत्मीयतेपेक्षा दुसरे काही श्रेष्ठ असते (भोग आणि ऐश्वर्य) तर आम्ही आपल्याकडून इच्छिलेही असते आणि मागितलेही असते. आता आपणच सांगा यापेक्षा श्रेष्ठ काय आहे?'' अशा प्रकारचे भाव ठेवणारे ते मलाच आनंद देणारे बनले असते, तर ते मग त्या तुच्छ आणि क्षणभंगुर देवलोकाला प्राप्त झाले नसते.

**पितॄन्यान्ति पितृव्रताः**—जे सकामभावनेने पितरांचे पूजन करतात त्यांना पितरांकडून कित्येक प्रकारचे साहय्य मिळत असते. म्हणून लौकिक सिद्धीची इच्छा करणारी माणसे पितरांच्या व्रताचे, नियमांचे, पूजन-विधीचे सांगोपांग पालन करतात आणि पितरांना आपले इष्ट मानतात. त्यांना अधिकाती अधिक आणि श्रेष्ठाती श्रेष्ठ फल हे मिळेल की, पितर त्यांना आपल्या लोकात घेऊन जातील. म्हणून येथे म्हटले गेले आहे की,

पितरांचे पूजन करणारे पितरांना प्राप्त होतात.

**भूतानि यान्ति भूतेज्याः**—तामस स्वभावाची माणसे सकामभावनेने भूत प्रेतांचे पूजन करतात आणि त्यांच्या नियमांना धारण करतात. जसे मंत्रजपासाठी गाढवाच्या शेपटीच्या केसाची दोरी बनवून, त्यांत उंटाच्या दाताचे मणी ओवून, रात्री स्मशानात जाऊन आणि प्रेतावर बसून भूत-प्रेतांच्या मंत्राचा जप करणे. मांस-दारू इत्यादी अत्यंत अपवित्र वस्तूंनी भूत प्रेतांचे पूजन करणे इत्यादी इत्यादी. यामुळे अधिकाती अधिक त्यांच्या सांसारिक कामना सिद्ध होऊ शकतात. मृत्यूनंतर तर त्यांची दुर्गतीच होईल, अर्थात् त्यांना भूत-प्रेत योनी प्राप्त होईल. म्हणून येथे म्हटले गेले आहे की, भूतांचे पूजन करणारे भूत-प्रेताला प्राप्त होतात.

**यान्ति मद्याजिनोऽपि माम्**—जो अनन्यभावाने कोणत्याही रीतीने माझ्या भजन, पूजन आणि चिंतनात मग्न होतो, तो निश्चितरूपाने मलाच प्राप्त होतो

## विशेष गोष्ट

सांसारिक भोग आणि ऐश्वर्याची कामना ठेवणारी माणसे आपापल्या इष्टाचे पूजन इत्यादी तत्परतेने करतात आणि इष्टाच्या प्रसन्नतेसाठी सर्व कामे करतात. परंतु भगवंताच्या ध्यान-भजनाकडे वळणारे ज्या तत्त्वाला प्राप्त होतात, त्याला प्राप्त न होता ते वांरवार सांसारिक तुच्छ भोगांना आणि नरकांना तसेच चौऱ्यांशी लाख योनींना प्राप्त होत राहतात. अशा प्रकारे जे मनुष्यजन्म मिळवून भगवंताशी प्रेमाचा संबंध जोडून त्यांनाही आनंद देणारे होऊ शकले असते, ते सांसारिक कामनेत फसून आणि तुच्छ देवता पितर इत्यादीच्या फंदात पडून केवढ्या अनर्थ परंपरेला प्राप्त होतात! म्हणून मनुष्याने फारच सावधगिरीने भगवंतातच लागले पाहिजे.

देवता, पितर, ऋषी, मुनी, मनुष्य इत्यादीत भगवद्बुद्धी असली आणि निष्कामभावनेने केवळ त्यांच्या पुष्टीसाठी, त्यांच्या हितासाठीच त्यांची सेवा-पूजा केली तर भगवंताची प्राप्ती होते. या देवता इत्यादींना भगवंताहून वेगळे समजणे आणि आपला सकामभाव ठेवणे हेच पतनाला कारण आहे.

भूत, प्रेत, पिशाच्च इत्यादी योनीही अशुद्ध आहेत आणि त्यांची पूजा विधी, सामग्री, आराधना, इत्यादीही अत्यंत अपवित्र असते. त्यांचे पूजक त्यांचे ठिकाणी भगवद्बुद्धिही करू शकत नाहीत* आणि निष्कामभावही ठेवू शकत नाहीत. म्हणून त्यांचे तर संपूर्णपणे पतनच होत असते. याविषयी काही वर्षापूर्वीची एक सत्य घटना आहे. एक जण ''कर्णपिशाचिनी'' ची उपासना करणारा होता. त्याच्याकडे आलेल्या माणसाच्या मनातील प्रश्न त्याला समजत असत आणि तो न विचारता ते प्रश्न सांगत असे आणि त्याचे उत्तर पण देत असे. त्यामुळे त्याने ह्या विद्येवर पुष्कळ पैसे मिळविले.

आता त्या विद्येचा चमत्कार पाहून एक सज्जन गृहस्थ त्याच्या मागे लागला की, ''मला ही विद्या शिकवा, मला शिकण्याची इच्छा आहे'' तेव्हा त्याने सरळ-पणाने उत्तर दिले की, ''ही विद्या चमत्कारीक तर पुष्कळ आहे, परंतु वास्तविक हित करणारी नाही''. मग असे आहे तर, ''आपण दुसऱ्याच्या मनातील न सांगताही प्रश्न आणि त्याचे उत्तर कसे जाणता?'' तेव्हा त्याने म्हटले की, ''मी आपल्या कानात विष्ठा लावून ठेवतो. जेव्हा कोणी प्रश्न विचारण्यासाठी माझ्याकडे येतो त्यावेळी कर्णपिशाचिनी येऊन माझ्या कानात त्याचा प्रश्न आणि त्याचे उत्तर सांगत असते आणि मी त्याप्रमाणे सांगतो'' मग त्याला विचारले की, ''आपले मरण कसे होईल? याविषयी आपण कधी विचारले की नाही?'' त्यावर त्याने सांगितले की, ''माझे मरण नर्मदेच्या काठावर होणार आहे'' त्याचा मृत्यू झाल्यावर असे कळले की, जेव्हा तो (आपला अंतकाळ जाणून) नर्मदेत जाऊ लागला तेव्हा कर्णपिशाचिनी डुकरीणीच्या रूपात त्याच्या समोर आली. तिला पाहून तो पळू लागला, तेव्हा कर्णपिशाचिनीने त्याला नर्मदेत जाण्यापूर्वी काठावरच ठार केले. कारण हे होते की, तो जर नर्मदेत मेला असता तर त्याची सद्गती झाली असती. परंतु कर्णपिशाचिनीने त्याची सद्गती होऊ दिली नाही आणि त्याला नर्मदेच्या काठावरच मारून त्याला आपल्याबरोबर घेऊन गेली.

---

* जर भक्ताचा एखाद्या भूत-प्रेतात भगवद्भाव जरी झाला तरी त्या भूत-प्रेताचा उद्धार होत असतो आणि भक्ताला भगवंताचे दर्शन होते जसे भक्त नामदेवजीना एक वेळ उंच व धिप्पाड शरीराचे एक भयंकर भूत भेटले तर ते त्याला भगवत्स्वरूपच समजून प्रसन्नतेने म्हणाले—

भले पधारे लंबक नाथ।<br>
धरनी पाँव स्वर्ग लों माथा, जोजन भरके लाँबे हाथ॥<br>
सिव सनकादिक पार न पावे, अनगिन साज सजाये साथ।<br>
नामदेव के तुम ही स्वामी कीजै मोको आज सनाथ॥

असे म्हणताच त्या प्रेताचा उद्धार झाला आणि त्याच्या जागी भगवान् प्रगट झाले.

याचे तात्पर्य देवता, पितर इत्यादीची उपासना स्वरूपाने त्याज्य नाही. परंतु भूत, प्रेत, पिशाच्च इत्यादीची उपासना स्वरूपानेच त्याज्य आहे. कारण देवतांच्या ठिकाणी भगवद्भाव आणि निष्कामभाव असला तर त्यांची उपासनाही कल्याणकारक होत असते. परंतु भूत-प्रेत इत्यादीच्या उपासकांची कधी सद्गती होतच नाही, दुर्गतीच होते.

मात्र पारमार्थिक साधक भूत-प्रेतांच्या उद्धारासाठी त्यांचे श्राद्ध-तर्पण करू शकतात. कारण त्या भूत-प्रेतांना आपले इष्ट मानून त्यांची उपासना करणे हेच पतनाचे कारण आहे. त्यांच्या उद्धारासाठी श्राद्ध-तर्पण करणे अर्थात् त्यांना पिंड-पाणी देणे हे काही दोषार्ह नाही. संत महात्म्याकडूनही अनेक भूत-प्रेतांचा उद्धार झालेला आहे.

**परिशिष्ट भाव**—'व्रत' याचा अर्थ आहे—नियम. म्हणून 'देवव्रत' शब्दाचा अर्थ झाला—देवतांच्या उपासनेच्या नियमांना धारण करणे (गीता ७। २०). भगवंताला शरण होऊन त्यांच्यासाठी कर्म करणे भगवंताचे पूजन आहे—**'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः'** (गीता १८। ४६).

संपूर्ण क्रिया भगवंताला अर्पण करण्याने सर्वप्रकारे भगवंताचे पूजन होते (गीता ९। २७). निष्कामभाव आणि भगवद्बुद्धी झाल्यामुळे कोणती निषिद्ध क्रिया होऊन शकत नाही. कारण कामनेमुळेच निषिद्ध क्रिया होत असते (गीता ३। ३६-३७).

वास्तविक सर्व काही भगवंताचेच रूप आहे. परंतु जो भगवंताशिवाय दुसऱ्या कोणत्याही स्वतंत्र सत्तेला मानतो, त्याचा उद्धार होत नाही. तो उच्चाती उच्च लोकात जरी गेला तरीही त्याला संसारात परत यावेच लागते (गीता ८। १६).

***संबंध***— *देवतांच्या पूजनात तर पुष्कळशी सामुग्री, नियम आणि विधीची आवश्यकता असते. तर आपल्या पूजनात तर यापेक्षा जास्त काठिण्य असेल? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

## पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।
## तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

| | |
|---|---|
| **यः** | = जो भक्त |
| **पत्रम्** | = पान; |
| **पुष्पम्** | = फूल, |
| **फलम्** | = फळ |
| **तोयम्** | = पाणी इत्यादी (यथा-साध्य व अनायास प्राप्त वस्तू) |
| **भक्त्या** | = प्रेमपूर्वक |
| **मे** | = मला |
| **प्रयच्छति** | = अर्पण करतो |
| **तत्** | = त्या (माझ्यात) |
| **प्रयतात्मनः** | = तल्लीन झालेल्या अंतः-करणाच्या भक्ताद्वारा |
| **भक्त्युपहृतम्** | = प्रेमपूर्वक दिलेला उपहार (भेट) |
| **अहम्** | = मी |
| **अश्नामि** | = खातो अर्थात् स्वीकार करतो. |

***व्याख्या***— [भगवंताच्या अपरा प्रकृतीची दोन कार्ये आहेत. पदार्थ आणि क्रिया. या दोन्हीशी आपली एकता मानूनच हा जीव आपल्याला त्यांचा भोक्ता आणि मालक समजतो आणि या पदार्थांचे आणि क्रियांचे भोक्ता आणि मालक भगवंत आहेत ही गोष्ट विसरतो. हे विस्मरण नाहीसे करण्यासाठीच भगवंत या ठिकाणी म्हणतात की, पत्र, पुष्प, फल इत्यादी जे काही पदार्थ आहेत आणि ज्या काही क्रिया आहेत (९। २७) त्या सर्वांना मला अर्पण करशील तर तू नेहमीसाठी कायमचे, झंझटातून मुक्त होशील (९। २८)

दुसरी गोष्ट देवतांच्या पूजनात विधि-विधानाची, मंत्र इत्यादीची आवश्यकता असते. परंतु माझा तर जीवाशी स्वतः स्वाभाविक आत्मीयतेचा संबंध आहे म्हणून माझ्या प्राप्तीत विधींची मुख्यता नाही. जसे बालक आईच्या मांडीवर बसतो, त्या वेळी त्याला कोणत्याही विधीची जरूरी नसते. तो तर केवळ आत्मीयतेच्या नात्यानेच आईच्या मांडीवर बसत असतो. तसेच माझ्या प्राप्तीसाठी विधी, मंत्र, इत्यादीची आवश्यकता नसते, केवळ आत्मीयतेच्या दृढ भावनेची आवश्यकता असते]

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति**— जो भक्त सहज यथासाध्य प्राप्त असलेले पत्र (तुलशीदळ इत्यादी) पुष्प, फळ, जल इत्यादीही प्रेमाने भगवंताला अर्पण करत असतो, तेव्हा भगवान् ते खाऊन टाकतात. जसे द्रौपदीपासून भाजीचे पान मागून खाऊन टाकले आणि त्रैलोक्याला तृप्त केले. गजेंद्राने सरोवरातील एक फूल भगवंताला अर्पण करून नमस्कार केला, तर भगवंतांनी गजेंद्राचा उद्धार केला. शबरीने दिलेली फळे भक्षण करून भगवंत इतके प्रसन्न झाले की, पुढे जेव्हा जेव्हा जेवणाचा प्रसंग येत असे, त्यावेळी त्यांना शबरीच्या फळाची आठवण होत असे.* रंतिदेवाने अंत्यजरूपाने आलेल्या भगवंताला

* घर गुरु गृह प्रियसदन सासुरे, भइ जब जहँ पहुनाई।
तब तहँ कहि सबरीके फलनिकी, रुचि माधुरी न पाई॥ (विनय पत्रिका १६४।४)

पाणी पाजले, तर त्यांना भगवंताचे साक्षात् दर्शन झाले.

जेव्हा भक्ताचा भगवंताला अर्पण करण्याचा भाव खूप अधिक वाढतो तेव्हा तो स्वत:ला विसरून जातो. भगवान्‌ही भक्तांच्या प्रेमामध्ये इतके मस्त होतात की, स्वत: आपल्याला विसरून जातात. प्रेमाच्या अधिक्यामुळे भक्ताला एवढीही शुद्ध राहत नाही की, मी काय देत आहे, तेव्हा भगवंतालाही ह्याचे भान राहत नाही की, मी काय खात आहे! जसे विदुराच्या पत्नीने प्रेमाच्या आवेशात भगवंताला केळाची सालपटे खाऊ घातली आणि गर बाहेर फेकून दिला, त्यावेळी भगवंताने गराप्रमाणेच सालपटेसुद्धा खाऊन टाकली.*

**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः**—भक्ताकडून प्रेमाने मिळालेल्या उपहाराचा भगवान् केवळ स्वीकार करत नाहीत तर, ते खाऊनच टाकतात-''**अश्नामि**'' जसे फूल वास घेण्याची वस्तू आहे. परंतु भगवंत हे पाहत नाहीत की, ही वस्तू खाण्याची आहे किंवा नाही, ते तर ती वस्तू खाऊनच टाकतात. त्याला आत्मसात करतात, आपल्यात सामील करून घेतात. यावरुन हे सिद्ध झाले की, भक्ताचा अर्पण करण्याचा भाव राहतो तर भगवंताचा स्वीकार करण्याचा भाव राहत असतो. जेव्हा भक्ताला भगवंतास खाऊ घालावे असे वाटते तेव्हा भगवंतालाही भूक लागत असते.

**प्रयतात्मनः**—याचे तात्पर्य, ज्याचे अंत:करण भगवंताचे ठिकाणी लीन झाले आहे जो केवळ भगवत्परायण आहे, अशा प्रेमी भक्ताकडून दिलेला उपहार (भेट) भगवंत स्वत: खाऊन टाकतात.

येथे पत्र, पुष्प, फळ, जल या चारींचे नाव घेण्याचे तात्पर्य, पत्र, पुष्प, फळ ही तिन्ही पाण्यापासून उत्पन्न होत असल्यामुळे जलाची कार्य आहेत आणि जल यांचे कारण आहे. म्हणून हे पत्र, पुष्प इत्यादी कार्य-कारणरूपी संपूर्ण पदार्थांचे उपलक्षण आहे कारण संपूर्ण सृष्टी जलाचे कार्य आहे आणि जल त्याचे कारण आहे म्हणून संपूर्ण पदार्थ भगवंताना अर्पण करावयास हवे.

या श्लोकात ''**भक्त्या**'' आणि ''**भक्त्युपहृतम्**'' या रुपात ''भक्ती'' शब्द दोन वेळ आला आहे. यात ''**भक्त्या**'' पदाने भक्ताचा भक्तिपूर्वक देण्याचा भाव आहे आणि ''**भक्त्युपहृतम्**'' पद भक्तिपूर्वक दिल्या गेलेल्या वस्तूचे विशेषण आहे. तात्पर्य भक्तिपूर्वक देण्याने ती वस्तू भक्तिरूपी, प्रेमरूपी होत असते त्यावेळी भगवंत तिला आत्मसात करतात, आपल्यात सामील करून घेतात, कारण ते प्रेमाचे भुकेले असतात.

## विशेष गोष्ट

या श्लोकात पदार्थांची मुख्यता नाही तर भक्ताच्या भावाची मुख्यता आहे. कारण भगवंत भावाचे भुकेले असतात, पदार्थांचे नव्हे. म्हणून अर्पण करणाऱ्याचा भाव मुख्य (भक्तियुक्त) असला पाहिजे. जसे एखादा अत्यंत गुरुभक्त शिष्य असेल तर, गुरूच्या सेवेत जितका समय, वस्तू, क्रिया, लागत असतील तितकाच त्याला आनंद मिळत असतो, प्रसन्नता होते. त्याचप्रमाणे पतीच्या सेवेत समय, वस्तू, क्रिया लागत असतील तर पतिव्रता स्त्रीला फार आनंद होत असतो. कारण पतीच्या सेवेतच आपल्या जीवनाची आणि वस्तूची तिला सफलता दिसत असते. तसेच भक्ताचा भगवंताशी प्रेमभाव असतो त्यावेळी वस्तू मग ती लहान असो अथवा मोठी, साधारण असो अथवा किंमतीची असो, ती भगवंताला अर्पण करण्यात भक्ताला फार आनंद होत असतो. त्याचा भाव असा राहतो की, संपूर्ण वस्तू भगवंताच्याच आहेत. मला भगवंतांनी सेवा पूजेचा अवसर दिला आहे ही माझ्यावर भगवंताची विशेष कृपा झाली आहे. या कृपेकडे पाहून तो प्रसन्न होत असतो.

भावनेने दाखवलेल्या नैवेद्याला भगवान् अवश्य स्वीकार करतात, मग ते आपल्याला दिसो अथवा न दिसो. या विषयात एक आचार्य म्हणत होते की, आमच्या मंदिरात दिवाळीपासून होळीपर्यंत अर्थात् थंडीच्या दिवसात ठाकुरजीला (भगवंताला)पिस्ता, बदाम, आक्रोड, काजू, चारोळी इत्यादीचा भोग (नैवेद्य) दाखविला जात होता. परंतु जेव्हा हे फार महाग झाले तेव्हा आम्ही शेंगदाण्याचा नैवेद्य दाखवणे सुरू केले. एके दिवशी रात्री भगवंतांनी स्वप्नात सांगितले ''अरे मित्रा! तू शेंगदाणेच खाऊ घालणार काय?'' त्या दिवसापासून पुन्हा मेवा नैवेद्याला वापरण्यात येऊ लागला. त्यांना हा विश्वास झाला की, जेव्हा भगवंताला नैवेद्य दाखविला जातो तेव्हा ते त्याचा स्वीकार करतात.

नैवेद्य दाखविल्यानंतर ज्या वस्तूंचा भगवान् स्वीकार करतात, त्या वस्तूत विलक्षणता येत असते अर्थात् त्या वस्तूंचा स्वाद वाढतो, त्यात सुगंध येऊ लागतो. त्या वस्तू भक्षण केल्यास विलक्षण तृप्तीचा अनुभव येतो. त्या वस्तू

* ''ततवेता'' तिहुँ लोकमें, भोजन कियो अपार।
इक शबरी इक विदुरघर रुच पायो दोबार॥

कितीही दिवस पडून राहिल्या तरी खराब होत नाहीत इत्यादी इत्यादी. परंतु ही काही परिक्षा नाही की, असे होतेच म्हणून! एखाद्या भक्ताचा असा भाव झाला तर भोग लावलेल्या वस्तूत विलक्षणता येते—असे आम्ही संताकडून ऐकले आहे.

मनुष्य जेव्हा पदार्थांची आहुती देतो त्यावेळी तो यज्ञ होतो. वस्तू दुसऱ्यांना दिल्या तर ते दान होते, संयमपूर्वक त्या वस्तू आपल्या उपयोगात न आणल्यास ते तप होते आणि भगवंताला अर्पण केल्यास भगवंताशी योग (संबंध) होतो. ही सर्व ''त्यागाचीच'' वेगवेगळी नावे आहेत.

**परिशिष्ट भाव**—देवतांच्या उपासनेत तर अनेक नियमांचे पालन करावे लागते (गीता ७।२०), परंतु भगवंताच्या उपासनेत कोणताही नियम नाही. भगवंताच्या उपासनेत प्रेमाची, आत्मीयतेची प्रधानता आहे, विधीची नव्हे—'**भक्त्या प्रयच्छति**', '**भक्त्युपहृतम्**'.

जसे भोळा बालक जे काही हातात येईल ते मुखात घालतो तसेच भोळे भक्त भगवंताला जे काही अर्पण करतात, त्याला भगवान्सुद्धा भोळे बनून खाऊन टाकतात—'**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्**' (गीता ४।११). जसे—विदुरपत्नीने केळाचे साल दिले तर भगवंताने तेच खाऊन टाकले.

'**भक्त्या प्रयच्छति**' चे तात्पर्य हे आहे की, भक्त भगवंताला प्रेमपूर्वक वस्तू अर्पण करतो, कोणत्या कामनेने नव्हे. देवतांच्या उपासनेत तर विशिष्ट वस्तूची आवश्यकता असते, परंतु भगवंताच्या उपासनेत विशिष्ट वस्तूची आवश्यकता नसते तर प्रेमाची आवश्यकता असते.

***संबंध**—संपूर्ण संसाराची दोन रूपे आहेत—पदार्थ आणि क्रिया. यांचे ठिकाणी आसक्ती झाल्याने ही दोन्हीही पतन करणारी होतात. म्हणून ''पदार्थ'' अर्पण करण्याची गोष्ट पूर्व श्लोकात सांगितली आणि आता पुढील श्लोकात ''क्रिया'' अर्पण करण्याची गोष्ट सांगत आहेत.*

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥ २७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुन्तीपुत्र! (तू) | **यत्** | = जे काही | **तपस्यसि** | = तप करतोस, |
| **यत्** | = जे काही | **जुहोषि** | = यज्ञ करतोस, | **तत्** | = ते (सर्व) |
| **करोषि** | = करतोस, | **यत्** | = जे काही | **मदर्पणम्** | = मला अर्पण |
| **यत्** | = जे काही | **ददासि** | = दान देतोस (आणि) | **कुरुष्व** | = कर. |
| **अश्नासि** | = भोजन करतोस, | **यत्** | = जे काही | | |

***व्याख्या***— [ भगवंताचा हा एक नियम आहे की, जो मला जसा शरण येतो तसाच मी त्याला आश्रय देतो. (४।११) जो भक्त आपली वस्तू मला अर्पण करतो, मी त्याला आपली वस्तू देतो. भक्त तर सीमित वस्तू देत असतो, परंतु मी अनंत पटीने त्याला देतो. परंतु जो आपण आपल्या स्वतःलाच मला अर्पण करतो, मी त्याला आपण आपल्या स्वतःला देऊन टाकतो. वास्तविक मी संपूर्ण संसाराला आपण आपल्या स्वतःला देऊन टाकले आहे. (९।४) आणि सर्वांना सर्व काही करण्याची स्वतंत्रता देऊन टाकली आहे. जर मनुष्य मी दिलेल्या स्वंतत्रतेला मला अर्पण करील, तर मीही आपली स्वतंत्रता त्याला अर्पण करतो अर्थात् मी त्याच्या अधीन होतो. म्हणून भगवान् येथे त्या स्वतंत्रतेला अर्पण करण्यासाठी अर्जुनाला म्हणत आहेत.]

**यत्करोषि**—हे पद असे विलक्षण आहे की, यात शास्त्रीय, शारीरिक, व्यावहारिक, सामाजिक, पारमार्थिक इत्यादी यावन्मात्र क्रिया येतात. भगवान् म्हणतात की, तू या संपूर्ण क्रियांना मला अर्पण कर अर्थात् तू स्वतःच मला अर्पण हो म्हणजे तुझ्या सर्व क्रिया आपोआपच मला अर्पण होतील.

आता पुढे भगवान् त्याच क्रियांचा विभाग करत आहेत.

**यदश्नासि**—या पदाच्या अंतर्गत संपूर्ण शारीरिक क्रिया घ्याव्या अर्थात् शरीरासाठी तू जे जेवण करतोस, पाणी पितोस, कुपथ्याचा त्याग आणि पथ्याचे सेवन करतोस, औषधी सेवन करतोस, वस्त्र नेसतोस, शीत-उष्णापासून शरीराचे रक्षण करतोस, स्वास्थ्यासाठी समयानुसार झोपतोस आणि जागतोस, चालतो-फिरतोस, शौच-स्नान करतोस इत्यादी सर्व क्रियांना तू मला अर्पण कर.

हा शरीरिक क्रियांचा प्रथम विभाग आहे.

**यज्जुहोषि**—या पदात यज्ञसबंधी सर्व क्रिया येतात. अर्थात् साहित्य-सामुग्री एकत्र करणे, अग्नी प्रगट करणे, मंत्रोच्चार करणे, आहुती देणे, इत्यादी सर्वच शास्त्रीय क्रिया मला अर्पण कर.

**ददासि यत्**—तू जे काही देतोस अर्थात् दुसऱ्यांची सेवा करतोस, दुसऱ्यांची साहाय्यता करतोस, दुसऱ्यांची आवश्यकता पूर्ती करतोस इत्यादी जी काही शास्त्रीय क्रिया करतोस ती सर्व मला अर्पण कर.

**यत्तपस्यसि**—तू जे काही तप करतोस अर्थात् विषयापासून आपल्या इंद्रियांचा संयम करतोस, आपल्या कर्तव्याचे पालन करत अनुकूल-प्रतिकूल परिस्थितींना प्रसन्नतापूर्वक सहन करतोस आणि तीर्थ, व्रत, भजन-ध्यान, जप-कीर्तन, श्रवण-मनन, समाधी इत्यादी जी काही पारमार्थिक क्रिया करतोस ती सर्व मला अर्पण कर.

उपर्युक्त तिन्ही पदे शास्त्रीय आणि पारमर्थिक क्रियांचा दुसरा विभाग आहे.

**तत्कुरुष्व मदर्पणम्**—येथे भगवंतांनी परस्मैपदी ''**कुरु**'' क्रियापद न देता आत्मनेपदी ''**कुरुष्व**'' क्रिया-पद दिले आहे. याचे तात्पर्य, तू सर्व काही मला अर्पण केले तर माझ्या उणीवेची पूर्तता होईल—असे नाही तर सर्व काही मला अर्पण केल्याने तुझ्याजवळ काही राहणार नाही अर्थात् तुझा ''मी'' आणि ''माझेपणा'' समाप्त होऊन जाईल जो बंधनकारक असतो. सर्व काही मला अर्पण करण्याचे फल म्हणून तुला पूर्णतेची प्राप्ती होऊन जाईल अर्थात् ज्या लाभापेक्षा श्रेष्ठ दुसरा कोणताच लाभ असणे संभवतच नाही आणि ज्या लाभात स्थित झाल्यावर कितीही भयंकर दु:ख प्राप्त झाले तरी, ते दु:ख विचलित करू शकत नाही अर्थात् जेथे दु:खाच्या संयोगाचाच अत्यंत वियोग असतो. (६।२२-२३) असा लाभ तुला प्राप्त होईल.

या श्लोकात ''**यत्**'' पद पाच वेळ म्हणण्याचे तात्पर्य, एक एक क्रिया अर्पण केली तरी त्याचे फार मोठे माहात्म्य आहे, मग संपूर्ण क्रिया अर्पण केल्यास त्याचे किती मोठे माहात्म्य होईल, हे काय सांगावयास पाहिजे?

## विशेष गोष्ट

सव्वीसाव्या श्लोकात तर भगवंतांनी जे सहज, अनायास परिश्रमाविना प्राप्त होणाऱ्या पत्र, पुष्प इत्यादी अर्पण करण्याची गोष्ट सांगितली. परंतु यात काही ना काही तरी उद्योग करावाच लागतो. अर्थात् सोप्यातल्या सोप्या वस्तूलाही भगवंताला अर्पण करण्याचा नवीन उद्योग करावा लागतो. परंतु या सत्तावीसाव्या श्लोकात भगवंतांनी त्याहीपेक्षा विलक्षण गोष्ट सांगितली की, कोणते नवीन पदार्थ द्यायचे नाहीत, कोणती नवीन क्रिया करायची नाही, कोणता नवीन उद्योगही करावयाचा नसतो तर आपल्याकडून ज्या लौकिक, पारमार्थिक इत्यादी स्वाभाविक क्रिया होत असतात त्यांना भगवंतास अर्पण करायचे असते. याचे तात्पर्य, भगवंताला कोणती वस्तू किंवा कोणती विशेष क्रिया अर्पण करण्याची जरूरी नाही तर स्वत:लाच भगवंताला अर्पण करून घेणे जरूरीचे आहे. स्वत: अर्पित झाल्याने सर्व क्रिया स्वाभाविकच भगवंताला अर्पण होतील. भगवंताच्या प्रसन्नतेला कारण होतील. जसे बाळ आपल्या आईसमोर खेळत असते, केव्हा दूर पळून जाते केव्हा आईच्या मांडीवर येऊन बसते, केव्हा पाठीवर चढते इत्यादी ज्या काही क्रिया बाळ करत असते, त्या क्रियेने आई प्रसन्न होत असते. आईच्या या प्रसन्नतेला बाळाचा आईशी असलेल्या आत्मीयतेचा भावच कारणीभूत असतो. त्याचप्रमाणे शरणागत भक्ताचा भगवंताशी आत्मीयतेचा भाव असल्याने भक्ताच्या प्रत्येक क्रियेने भगवंत प्रसन्नच होत असतात.

येथे ''**करोषि**'' क्रियेबरोबर सामान्य ''**यत्**'' पद असल्याने अर्थात् ''तू जे काही करतोस'' असे म्हणण्यात निषिद्ध क्रियाही येऊ शकते. परंतु शेवटी ''**तत्कुरुष्व मदर्पणम्**'' ''ते मला अर्पण कर'' असे आले आहे. म्हणून जी वस्तू अथवा क्रिया भगवंताला अर्पण केली जाईल, ती भगवदाज्ञेनुसार भगवंताला अनुकूलच असेल. जसे एखाद्या त्यागी पुरुषाला एखादी वस्तू दिली जाईल तर ती त्याला अनुकूल असेल तीच दिली जाईल, निषिद्ध वस्तू दिली जाणार नाही. तसेच भगवंताला कोणती वस्तू अथवा क्रिया अर्पण केली जाईल तर त्यांच्या अनुकूल, विहित वस्तू अथवा क्रियाच अर्पण केली जाईल, निषिद्ध नव्हे. कारण ज्याचा भगवंताशी अर्पण करण्याचा भाव आहे, त्याच्याकडून निषिद्ध क्रियाही होणे संभवत नाही आणि निषिद्ध क्रिया अर्पण करणेही शक्य नाही.

जर कोणी म्हणेल की, ''आम्ही तर चोरी इत्यादी निषिद्ध क्रियासुद्धा भगवंताला अर्पण करणार'' तर हा नियम आहे की, भगवंताला दिलेले अनंत पटीने परत मिळत असते. म्हणून चोरी इत्यादी निषिद्ध क्रिया भगवंताला अर्पण केल्या तर त्याचे फलसुद्धा अनंत पटीने मिळेल अर्थात् त्याचा संगोपांग दंड भोगावाच लागेल.

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात 'पदार्थ' अर्पण करण्याचा आणि या श्लोकात 'क्रिया' अर्पण करण्याचा विषय आला आहे. आदरपूर्वक देणे आणि त्याचीच वस्तू त्याला देणे 'अर्पण' म्हणविले जाते. भगवंताने पदार्थ देण्यास सांगितले आहे—'**प्रयच्छति**' आणि क्रिया अर्पण करण्यास सांगितले आहे—'**तत्कुरुष्वमदर्पणम्**', कारण क्रिया दिल्या जात नाहीत.

ज्ञानयोगी तर संसाराशी मानलेल्या संबंधाचा त्याग करतो, परंतु भक्त एका भगवंताशिवाय दुसरी सत्ता मानतच नाही. दुसऱ्या शब्दात, ज्ञानयोगी 'मी' आणि 'माझे' याचा त्याग करतो आणि भक्त 'तू' आणि 'तुझे' याचा स्वीकार करतो. म्हणून ज्ञानयोगी पदार्थ व क्रियांचा 'त्याग' करतो आणि भक्त पदार्थ व क्रिया यांना भगवंताला अर्पण करतो अर्थात् त्यांना आपले न मानता भगवंताचे आणि भगवत्स्वरूप मानतो.

ज्या वस्तूत मनुष्याची सत्यत्व व महत्वबुद्धी असते, तिला मिथ्या समजून तिचा सहज त्याग करण्यापेक्षा कोण्या व्यक्तीला समर्पण करणे, त्याच्या सेवेत लावणे सोपे पडते. मग जे परम श्रद्धास्पद, परम प्रेमास्पद भगवान् आहेत, त्यांना अर्पण करण्यातील सोपेपणा काय वर्णन करावा! दुसरी गोष्ट त्यागीला अभिमानही येऊ शकतो, परंतु अर्पण करणाऱ्याला अभिमान येऊ शकत नाही. कारण ज्याची वस्तू असते त्यालाच ती देण्याने अभिमान कसा येईल? '**त्वदीयं वस्तु गोविन्द तुभ्यमेव समर्पये**' संपूर्ण वस्तू (सर्व संसार) नेहमीसाठीच भगवंताच्या आहेत. त्यांना भगवंताला अर्पण करणे केवळ आपल्या भ्रमाला (त्यांना आपले मानलेल्या भ्रमाला) समाप्त करणे आहे. भ्रम (अज्ञान) समाप्त झाल्यावर अभिमान येत नाही तर प्रसन्नता प्राप्त होते.

संसाराला भगवंताचे मानताच संसाराशी संबंध-विच्छेद होतो अर्थात् संसार लुप्त होतो, संसाराची स्वतंत्र सत्ता राहत नाही (जी वास्तविक नाहीच), तर भगवान्‌च राहतात (जे वास्तविक आहेत). म्हणून संसाराशी संबंध-विच्छेद करण्यासाठी भक्ताला विवेकाची आवश्यकता नाही. तो संसाराशी संबंध-विच्छेद (त्याग) करीत नाही, तर त्याला भगवंताचे आणि भगवत्स्वरूप मानतो, कारण अपरा-प्रकृती भगवंताचीच आहे (गीता ७।४).

***संबंध**—मागील दोन श्लोकांत पदार्थ आणि क्रियांना भगवंतास अर्पण करण्याचे वर्णन करून आता पुढील श्लोकात त्या अर्पणाचे फल सांगतात.*

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि॥ २८॥**

**एवम्** = अशाप्रकारे (मला अर्पण करण्याने)
**कर्मबन्धनैः** = कर्मबंधनापासून (आणि)
**शुभाशुभफलैः** = शुभ (विहित) आणि अशुभ (निषिद्ध) संपूर्ण कर्मांच्या फलापासून
**मोक्ष्यसे** = (तू) मुक्त होशील
**सन्न्यासयोग-युक्तात्मा** = असा आपल्यासह सर्व काही मला अर्पण करणारा (आणि)
**विमुक्तः** = सर्वांपासून मुक्त झालेला (तू)
**माम्** = मला
**उपैष्यसि** = प्राप्त होशील.

*व्याख्या*—**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः**—पूर्वोक्त प्रकाराने सर्व पदार्थ आणि क्रिया मला अर्पण करण्याने अर्थात् तुझ्या स्वतःच अर्पित होण्याने अनंत जन्मांची जी शुभाशुभ कर्मांची फले आहेत त्या सर्वांपासून तू मुक्त होशील. ते कर्मफल तुला जन्म-मरण देणारे होणार नाहीत.

येथे शुभ आणि अशुभ कर्म म्हणजे अनंत जन्मात केलेली संचित शुभा-शुभ कर्म घेतली पाहिजेत. कारण भक्त वर्तमानात भगवदाज्ञेनुसार केलेली कर्मच भगवंताला अर्पण करत असतो. भगवदाज्ञेनुसार केलेली कर्म शुभच असतात, अशुभ होतच नाहीत. मात्र जर एखाद्या कारणाने, एखाद्या परिस्थितीमुळे, पूर्वाभ्यासामुळे भक्ताकडून थोडेही अनुषंगिक अशुभ कर्म घडले तर त्यावेळी त्याच्या हृदयात विद्यमान् असलेले भगवान् त्या अशुभ कर्माला नष्ट करून टाकतात.*

जितकी काही कर्म केली जातात ती सर्व बाह्य असतात अर्थात् शरीर, मन, बुद्धी, इंद्रिय इत्यादीद्वाराच होत असतात. म्हणून त्या शुभ आणि अशुभ कर्माचे अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थितीच्या रूपात जे फल प्राप्त होते तेही बाह्यच असते. मनुष्य अज्ञानाने त्या परिस्थितीशी आपला संबंध जोडून सुखी-दुःखी होत राहतो. हे सुखी-दुःखी होणेच कर्मबंधन आहे आणि यामुळेच तो जन्मत-मरत राहतो. परंतु भक्ताची दृष्टी अनुकूल-

* विकर्म यच्चोत्पतितं कथञ्चिद् धुनोति सर्वं हृदि सन्निविष्टः॥ (श्रीमद्भा० ११।५।४२)

प्रतिकूल परिस्थितीकडे न राहता भगवंताच्या कृपेवरच राहत असते अर्थात् भक्त त्याला भगवंताचे विधानच मानतो, कर्माचे फल मानतच नाही. म्हणून तो अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीरूपी कर्मबंधनातून मुक्त होतो.

**संन्यासयोगयुक्तात्मा**—संपूर्ण कर्मांना भगवंतास अर्पण करण्याचे नांव "संन्यासयोग" आहे. ह्या संन्यासयोग अर्थात् समर्पणयोगयुक्त असणाऱ्यांना येथे **"संन्यासयोगयुक्तात्मा"** म्हटले गेले आहे. त्याचप्रमाणे गीतेत पुष्कळ ठिकाणी "संन्यास" श्ब्द सांख्ययोगाचा वाचक येतो परंतु याचा प्रयोग भक्तीतही येतो जसे **"मयि संन्यस्य"** (१८।५७)

जसे सांख्ययोगी संपूर्ण कर्मांना मनाने, नऊ द्वार असलेल्या शरीरात ठेवून स्वत: आपण आपल्या स्वरूपात सुखाने स्थित राहत असतो (५।१३) त्याचप्रमाणे भक्त कर्माशी स्वत: मानलेल्या संबंधाला भगवंतात प्रस्थापित करतो. तात्पर्य जसे एखादा सज्जन आपली ठेव एखाद्या विश्वासू माणसाकडे ठेवतो तसेच भक्त स्वत:सह अनंत जन्मांच्या संचित कर्मांना, त्यांच्या फलांना आणि त्यांच्या संबंधाला भगवंताशी जोडतो. म्हणून याला "संन्यासयोग" म्हटले गेले आहे.

**विमुक्तो मामुपैष्यसि**—पूर्वश्लोकात **"तत्कुरुष्व मदर्पणम्"** म्हणून अर्पण करण्याची आज्ञा दिली. येथे म्हणतात की, या प्रकारे अर्पण करण्याने तू शुभ-अशुभ कर्मफलापासून मुक्त होशील. शुभाशुभ कर्मफलापासून मुक्त झाल्यावर तू मला प्राप्त होशील. तात्पर्य, संपूर्ण कर्मफलापासून मुक्त होणे तर प्रेमप्राप्तीचे साधन आहे आणि भगवंताची प्राप्ती होणे म्हणजे प्रेमाची प्राप्ती होणे आहे.

## विशेष गोष्ट

शुभ* आणि अशुभ कर्मांचे बंधन काय आहे?

शुभ अथवा अशुभ कोणतेही कर्म केले तरी, त्या कर्माचा आरंभ आणि अंत होत असतो. त्याचप्रमाणे त्या कर्माच्या फलरूपात जी परिस्थिती येत असते त्याचाही संयोग आणि वियोग होत असतो. तात्पर्य, जर कर्म आणि त्याचे फल निरंतर राहत नाही, तर मग त्यांच्याशी निरंतर संबंध कसा राहू शकतो? परंतु जेव्हा कर्ता (कर्म करणारा) कर्माशी आपलेपणा करून घेतो तेव्हा त्याचा फलाशी संबंध जुटतो. जरी कर्म आणि फलाशी संबंध कधी राहू शकत नाही, तरीपण कर्ता त्या संबंधाला आपल्यात मानून घेतो. कर्ता स्वत: (स्वरूपाने) नित्य आहे. म्हणून त्या संबंधाला आपल्यात स्वीकार केल्याने तो संबंधही नित्य प्रतीत होऊ लागतो.

कर्ता शुभकर्माचे फल इच्छितो, जे अनुकूल परिस्थितीच्या रूपात समोर येत असते. त्या परिस्थितीत हा सुख मानतो. जोपर्यंत या सुखाची इच्छा राहते तोपर्यंत तो दु:खातून सुटू शकत नाही. कारण सुखाच्या आरंभी आणि शेवटी दु:खच असते, तसेच सुखापासूनही प्रत्येक क्षणाला वियोग होत असतो. ज्याच्या वियोगाची हा प्राणी इच्छा करत नाही, त्याचा वियोग तर होतोच होतो हा नियम आहे. तात्पर्य सुखाच्या इच्छेला हा सोडत नाही आणि दु:ख याला सोडत नाही.

जीव जेव्हा स्वत: आपल्याला भगवंताशी समर्पित करतो तेव्हा याची (साक्षात् परमात्म्याचा अंश असल्याने) परमात्म्याशी आपोआप अभिन्नता होत असते आणि शरीराशी अज्ञानाने मानलेला संबंध समाप्त होतो. हा परमात्म्याशी अभिन्न तर पूर्वीपासूनच होता. केवळ आपल्यासाठी कर्म केल्याने या अभिन्नतेचा अनुभव येत नव्हता. आता स्वत:-सहित आपण आपल्याला भगवंताना अर्पण करण्याने त्याची आपल्यासाठी कर्म करण्याची मान्यता समाप्त होते आणि त्याला स्वाभाविक प्रेमाची प्राप्ती होत असते. यालाच भगवंताने येथे **"विमुक्तो मामुपैष्यसि"** म्हटले आहे.

जेव्हा हा जीव स्वत: आपल्याला भगवंताना समर्पित होतो तर मग त्याच्यासमोर जी काही अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती येत असते, ती सर्व दया आणि कृपेच्या रूपात परिणत होत असते. तात्पर्य, जेव्हा त्याच्यासमोर अनुकूल परिस्थिती येत असते, तेव्हा तो भगवंताची "दया" समजत असतो आणि जेव्हा प्रतिकूल परिस्थिती येत असते तेव्हा तो भगवंताची "कृपा" समजत असतो. दया आणि कृपेत फरक असा आहे की, कधी भगवंत प्रीतीने, स्नेहाने जीवाला कर्मबंधनातून मुक्त करतात—ही "दया" आहे आणि कधी शासन, शिक्षा करून त्याच्या पापाचा नाश करतात—ही "कृपा" आहे. अशा प्रकारे दया आणि कृपा करून भगवंत भक्ताला सबल, सहिष्णू बनवतात. परंतु भक्त तर दोन्हीतही प्रसन्न राहत असतो. कारण त्याची दृष्टी अनुकूलता प्रतिकूलतेकडे न राहता केवळ भगवंताकडेच राहत असते.

म्हणून त्याच्या दृष्टीत भगवंताची दया आणि कृपा दोन रूपात नसते, तर एकाच रूपात असते—जसे म्हटले गेले आहे—

* जसे अशुभ कर्म बंधनकारक आहे तसेच शुभ कर्मही बंधनकारक आहे. जसे बेडी लोखंडाची असो की सोन्याची असो परंतु बंधन तर दोन्हींनीही होते. शुभ कर्मही जन्मारंभक असल्याने बंधनकारक आहे आणि अशुभ कर्म तर जबरीने बांधणारे असतेच.

लालने ताडने मातुर्नाकारुण्यं यथार्भके।
तद्वदेव महेशस्य नियन्तुर्गुणदोषयोः॥

''ज्याप्रमाणे बालकाचे लालन पालन करणे आणि शिक्षा करणे दोन्हीत आईची केव्हाही अवकृपा नसते, त्याच-प्रमाणे जीवांच्या गुण दोषांचे नियंत्रण करणाऱ्या अशा परमेश्वराची कधीही कोणावरही अवकृपा होत नाही.''

**परिशिष्ट भाव**— भगवंताने '**यान्ति मद्याजिनोऽपि माम्**' (९।२५) पासून जी गोष्ट आरंभ केली होती, त्याचाच उपसंहार करीत म्हणतात की, संपूर्ण क्रिया आणि पदार्थांना आपल्यासह मला अर्पण करण्याने तू कर्मबंधनापासून आणि शुभाशुभ दोन्ही कर्मांच्या फलापासून मुक्त होऊन मलाच प्राप्त होशील.

'कर्म' ही शुभाशुभ होतात आणि 'फल' ही शुभाशुभ होतात. दुसऱ्यांच्या हितासाठी करणे 'शुभ कर्म' आहे आणि आपल्यासाठी करणे 'अशुभ कर्म' आहे. अनुकूल परिस्थिती 'शुभ फल' आहे आणि प्रतिकूल परिस्थिती 'अशुभ फल' आहे. भगवंताचा भक्त शुभ कर्मांना भगवंताला अर्पण करतो, अशुभ कर्म करतच नाही आणि शुभाशुभ फलाने अर्थात् अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीने सुखी-दुःखी होत नाही. त्याची अनंत जन्मींची संचित शुभाशुभ कर्म भस्म होतात. जसे जळत असेलेली गवताची काडी टाकल्याने सर्व गवत जळून जाते!

भगवंताला अर्पण करण्याने संसाराचा संबंध (गुणसंग) राहत नाही. केवळ भगवंताचा संबंध राहतो, जो सहज पूर्वीपासूनच आहे—'**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः**' (गीता १५।७). जे आपले नाही त्याला आपले मानल्याने बंधनाशिवाय दुसरे काही होत नाही. आपले मानल्याने वस्तू तर राहत नाही, केवळ बंधन राहते. भक्ताची कोणत्याही वस्तूत, व्यक्तीत आणि क्रियेत आत्मीयता न राहिल्याने तो 'विमुक्त' होतो.

येथे समर्पणयोगाला 'संन्यासयोग' या नावाने म्हटले गेले आहे

'**मामुपैष्यसि**' पदाचे तात्पर्य हे आहे की, भक्त भगंताशी अभिन्न होतो, त्याची आपली स्वतःची स्वतंत्र सत्ता राहत नाही—'**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**' (गीता ७।१८). यालाच प्रेमाद्वैत म्हटले गेले आहे.

***संबंध***—*आता एक शंका येते की, जे भगवंताला समर्पित होतात त्यांना तर भगवान् मुक्त करून टाकतात आणि जे भगवंताला समर्पित होत नाहीत त्यांना भगवान् मुक्त करत नाहीत—यात तर भगवंताची दयाळुता आणि समता झाली नाही तर विषमदृष्टी आणि पक्षपात झाला. यावर म्हणतात—*

## समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।
## ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्॥ २९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम्** | = मी | **अस्ति** | = आहे (आणि) | **माम्** | = माझे |
| **सर्वभूतेषु** | = संपूर्ण प्राण्यात | **न** | = न कोणी | **भजन्ति** | = भजन करतात, |
| **समः** | = समान आहे. | **प्रियः** | = प्रेमाचा विषय आहे | **ते** | = ते |
| **न** | = (त्या प्राण्यात) न तर कोणी | **तु** | = परंतु | **मयि** | = माझ्यात आहेत |
| **मे** | = माझ्या | **ये** | = जे | **च** | = आणि |
| **द्वेष्यः** | = द्वेषाचा विषय | **भक्त्या** | = प्रेमपूर्वक | **अहम्, अपि** | = मीही |
| | | | | **तेषु** | = त्यांच्यात आहे |

*व्याख्या*— **समोऽहं सर्वभूतेषु**—मी स्थावर-जंगम इत्यादी संपूर्ण प्राण्यांविषयी व्यापकरूपाने आणि कृपादृष्टीने सम आहे. तात्पर्य, मी सर्वात समानरूपाने व्यापक परिपूर्ण आहे—''**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**'' (९।४) आणि माझी सर्वांवर समानरूपाने कृपादृष्टी आहे—''**सुहृदं सर्वभूतानाम्**'' (५।२९)

मी कुठे कमी आणि कुठे जास्त आहे अर्थात् मुंगी लहान असल्याने त्यात कमी आहे आणि हत्ती मोठा असल्याने त्यात अधिक आहे, अंत्यजात कमी आहे आणि ब्राह्मणात अधिक आहे, जे माझ्याशी प्रतिकूल वागतात त्यांच्यात कमी आणि जे मला अनुकूल असतात त्यात अधिक आहे—अशी गोष्ट नाहीच. कारण सर्वचे सर्व प्राणी माझे अंश आहेत, माझी स्वरूपे आहेत. माझी स्वरूपे असल्याने ते माझ्यापासून कधी वेगळे होऊ शकत नाहीत आणि मीही त्यांच्यापासून कधी वेगळा होऊ शकत नाही. म्हणून मी सर्वात समान आहे. माझा कुठेही कोणाशीही

पक्षपात नाही. तात्पर्य, प्राण्यात जन्माने, कर्माने, परिस्थितीने, घटनेने, संयोग, वियोग इत्यादीने अनेक प्रकारची विषमता असूनही मी संपूर्णपणे नित्य सर्वात समानरीतीने व्यापक आहे, कुठे कमी आणि कुठे अधिक नाही.

**न मे द्वेष्योऽस्ति न प्रिय:** *—पूर्वी भगवंतांनी म्हटले की, मी संपूर्ण प्राण्यांत समान आहे. आता त्याचेच विवेचन करत आहेत की, कोणीही प्राणी माझ्या राग-द्वेषाचा विषय नाही. तात्पर्य, मला विमुख होऊन एखादा मनुष्य शास्त्रीय यज्ञ, दान, इत्यादी कितीही शुभ कर्म करो तरीही तो माझ्या "राग" याचा विषय नाही आणि दुसरा कोणी शास्त्र निषिद्ध अन्याय, अत्याचार इत्यादी कितीही अशुभ कर्म करो, तरी-ही तो माझ्या "द्वेषा" चा विषय नसतो. कारण मी संपूर्ण प्राण्यात समानरीतीने व्याप्त आहे, सर्वांवर माझी समानरीतीने कृपा आहे आणि सर्व प्राणी माझे अंश असल्याने मला समान रीतीने आवडते आहेत. मात्र ही गोष्ट जरूर आहे की, जो सकामभावपूर्वक शुभ कर्म करेल तो उच्च गतीला जाईल आणि जो अशुभ कर्म करेल तर तो नीच गतीत अर्थात् नरक तसेच चौऱ्यांशीलाख योनीत जाईल. परंतु ते दोन्ही पुण्यात्मा आणि पापात्मा असूनही माझ्या राग-द्वेषाचे विषय नव्हेत.

जर मी निर्माण केलेले पृथ्वी, आप, तेज, वायू, आणि आकाश—हे भौतिक पदार्थही प्राण्यांच्या चांगल्या वाईट आचरणांना आणि भावांना अनुसरून त्यांना राहण्याचे स्थान देण्यात, त्यांची तहान भागविण्यात, त्यांना प्रकाश देण्यात, त्यांना चालण्या फिरण्यासाठी अवकाश देण्यात, राग-द्वेषपूर्वक विषमता करीत नाहीत, सर्वांशी समानरीतीने वागतात. तर मग प्राणी चांगल्या वाईट आचरणाच्या अनुषंगाने माझ्या राग-द्वेषाचे विषय कसे बनू शकतील? अर्थात् बनू शकत नाहीत. कारण ते साक्षात् माझेच अंश आहेत, माझीच स्वरूपे आहेत.

जसे एखाद्या व्यक्तीच्या हाताला जखम झाली आहे तो हात शरीराच्या कोणत्याही कामात उपयोगाला येत नाही, जखम झाल्याने रात्री झोपू देत नाही, काम करण्यात बाधा आणतो आणि दुसरा हात सर्व प्रकाराने शरीराच्या उपयोगात येत असतो. परंतु त्या व्यक्तीचा कोणत्याही हाताविषयी राग द्वेषाचा भाव राहत नाही की, हा हात चांगला आहे आणि हा हात वाईट आहे. कारण दोन्हीही हात त्याची अंग आहेत आणि आपल्या अंगाविषयी कोणाचेही राग द्वेष राहत नाहीत. त्याचप्रमाणे कोणी माझ्या वचन आणि सिद्धांतांनुसार चालणारा असो, पुण्यात्मापेक्षा पुण्यात्मा असो आणि दुसरा कोणी माझ्या वचन आणि सिद्धांतांचे खंडन करणारा असो, माझ्याविरुद्ध चालणारा असो, पाप्यातला पापी असो, तरीही त्या दोघाविषयी मला राग-द्वेष नसतात. त्यांच्या आपापल्या आचरणात, वर्तणुकीत फरक आहे, म्हणून त्यांच्या परिणामा-मध्ये (फलात) फरक राहील, परंतु माझा कोणाविषयीही राग-द्वेष नसतो. जर कोणाविषयी राग-द्वेष असता तर **"समोऽहं सर्वभूतेषु"** हे म्हणणेच संभवले नसते कारण विषमतेमुळेच राग-द्वेष निर्माण होत असतात.

**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्**—परंतु जे भक्तिपूर्वक माझे भजन करतात अर्थात् ज्यांची संसाराविषयी आसक्ती, राग आणि ओढ राहिलेली नसते, जे केवळ मलाच आपले मानतात, केवळ मत्परायण असतात, केवळ माझ्या प्रसन्नतेसाठीच रात्रंदिवस काम करत राहतात आणि जे शरीर, इंद्रिय, मन, वाणीद्वारा माझीच भक्ती करतात. (९।१४; १०।९) ते माझ्यात असतात आणि मी त्यांच्यात असतो.

प्रेमपूर्वक माझे भजन करणारे भक्त माझ्यात आहेत आणि मी त्यांच्यात आहे, याचा अर्थ असा नाही की, जे सामान्य जीव आहेत तसेच माझ्या आज्ञेविरुद्ध चालणारे आहेत; ते माझ्यात आणि मी त्यांच्यात नाही, तर ते आपल्याला माझ्यात मानीतच नाहीत. ते असे म्हणतात की, आम्ही तर संसारी जीव आहेत, संसारात राहणारे आहोत. ते हे समजत नाहीत की, संसार, शरीर तर कधी एकरूप एकरस राहतच नाही तर अशा संसारात शरीरात आम्ही कसे स्थिर राहू शकतो? हे न जाणल्यामुळेच ते आपल्याला संसार, शरीर यात स्थित मानत असतात. त्यांच्यापेक्षा जे रात्रंदिवस माझ्या भजन-स्मरणात मग्न असतात, अंतर्बाह्य, वर-खाली, सर्व देश, काल वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, क्रिया इत्यादीत आणि स्वत: आपल्यातही मलाच मानतात, ते माझ्यात विशेषरूपाने असतात आणि मी त्यांच्यात विशेषरूपाने असतो.

दुसरा भाव असा आहे की, जे माझ्याशी "मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत" असा संबंध जोडून घेतात, त्यांची माझ्याशी इतकी घनिष्टता होते की, मी आणि ते एक होतात **"तस्मिंस्तज्जने भेदाभावात्"** (नारदभक्ति

* या ठिकाणी "प्रिय" शब्द आसक्तीचाच वाचक समजला पाहिजे कारण प्राणीमात्रावर भगवंताची समानरीतीने प्रियता आहे—सब मम प्रिय सब मम उपजाए (मानस ७।८६।२) म्हणून भगवान् याचा निषेध कसे करू शकतात? दुसरी गोष्ट "द्वेष्य" शब्दाबरोबर "राग" श्ब्दच योग्य बसतो कारण राग आणि द्वेष हे द्वन्द्व आहे. याच द्वन्द्वाचा येथे निषेध केला गेला आहे.

सूत्र ४१). म्हणून ते माझ्यात आणि मी त्यांच्यात असतो.

तीसरा भाव असा आहे की, त्यांच्यात "मी" पणा राहत नसतो; कारण "मी" पणा एक परिच्छिन्नता आहे. ही परिच्छिन्नता (एकदेशीयपणा) समाप्त झाल्याने ते माझ्यातच राहतात.

आता कोणी भगवंताना असे म्हणेल की, आपण भक्तात विशेषतेने प्रगट होता आणि दुसऱ्यात कमी प्रतीने तर ही आपली विषमता का? त्यावेळी भगवंत म्हणतात की, हे सख्या, माझ्यात तर ही विषमता भक्तांमुळे होते. जर कोणी माझे भजन केले, मत्परायण झाले, मला शरण आले आणि मी त्याच्याशी विशेष प्रेम केले नाही, त्याच्यात विशेषतेने प्रगट झालो नाही तर ही माझी विषमता होईल. कारण भजन करणारे आणि भजन न करणारे दोघातही मी समानच राहीलो तर हा न्याय होणार नाही, तर माझी विषमता होईल. असे झाले तर, भक्तांच्या भजनाचे आणि त्यांच्या भक्तीचे काहीही मूल्य राहणार नाही. ही विषमता माझ्यात येऊ नये, म्हणून जो ज्या प्रकारे मला शरण येतो, मी ही त्याला त्याच प्रकारे आश्रय देत असतो **"ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्"** (४।११) म्हणून ही विषमता भक्तांच्या भावाच्या अनुसरूनच असते.*

जसे एखादा पुत्र चांगले काम करत असेल तर सुपुत्र म्हणविला जातो आणि जो वाईट काम करत असतो तो कुपुत्र म्हणविला जातो. हा सुपुत्र-कुपुत्राचा फरक तर त्यांच्या आचरणाच्या अनुषंगाने असतो. आई-वडिलांच्या पुत्रभावात काहीही फरक पडत नाही. गायीच्या स्तनाजवळ गोचिड राहतात, ते दूध न पिता रक्त पीत राहतात, तर ही विषमता गायीची नव्हे, तर गोचिडाची स्वतःची आहे. विजेने कुठे बर्फही तयार होतो तर कोठे अग्नीही उत्पन्न होतो, तर ही विषमता विजेची नव्हे तर यंत्राची आहे. तसेच जे भगवंतामध्ये राहूनही भगवंताला मानीत नाहीत, त्यांचे भजन करत नाहीत तर ही विषमता त्या माणसांचीच आहे, भगवंताची नव्हे. जसे लाकडाचा तुकडा, काचेचा तुकडा आणि अंतर्गोलात्मक काच—या तिन्हीत सूर्याची कोणतीच विषमता नसते परंतु सूर्यप्रकाशात ठेवल्यावर लाकडाचा तुकडा किरणांना रोखतो, काचेचा तुकडा किरणांना रोखत नाही आणि अंतर्गोलात्मक काच किरणांना एका ठिकाणी केंद्रित करून अग्नी प्रगट करतो. तात्पर्य, ही विषमता समोर येणाऱ्या पदार्थाची आहे, सूर्याची नव्हे. सूर्याची किरणे तर सर्वांवर समानच पडत असतात. ते पदार्थ त्या किरणांना जितके ग्रहण करतात तितकेच ती किरणे त्यात प्रगट होतात. त्याचप्रमाणे भगवान् सर्व प्राण्यात समानरूपाने व्यापक असतात, परिपूर्ण असतात. परंतु जे प्राणी भगवंताला सम्मुख होतात, भगवंताचे आणि भगवंताच्या कृपेचे प्राकट्य त्यांच्यात विशेषतेने होत असते. त्यांची भगवंताविषयी जितकी अधिक प्रियता असते, भगवंताचीही तितकीच अधिक प्रियता प्रगट होत असते. ते स्वतः आपण आपल्याला भगवंताना अर्पित होतात तर भगवंतही स्वतः आपण आपल्याला त्यांना अर्पित होतात. अशा प्रकारे भक्तांच्या भावानुसारच भगवंताची विशेष कृपा, प्रियता इत्यादी प्रगट होतात.

तात्पर्य, माणसे संसाराच्या आसक्तीमुळेच स्वतःला संसारात मानतात. जर ती भगवंताचे प्रेमपूर्वक भजन करू लागली, तर त्यांची संसारिक आसक्ती समाप्त होते आणि ती आपल्या दृष्टीने भगवंतात मिसळून जातात आणि भगवंत त्यांच्यात मिसळून जातात. भगवंताच्या दृष्टीने तर ती वास्तविक भगवंतामध्येच होती आणि भगवंत देखील त्यांच्यातच होते, केवळ संसारासक्तीमुळेच ती आपल्याला भगवंतात आणि भगवंताना आपल्यात मानीत नव्हती.

भगवंतांनी येथे **"ये भजन्ति"** पदात **"ये"** सर्वनाम पद दिले आहे, ज्याचे तात्पर्य, मनुष्य कोण्याही देशाचा असो, कोण्याही वेशाचा असो, कोणत्याही अवस्थेचा असो, कोणत्याही संप्रदायाचा असो, कोणत्याही वर्णाचा असो, कोणत्याही आश्रमाचा असो, कशाही योग्यतेचा असो, तो जर माझे भक्तिपूर्वक भजन करतो तर तो माझ्यात आणि मी त्याच्यात आहे. जर या ठिकाणी भगवंत एखाद्या वर्ण, आश्रम, संप्रदाय, जाती इत्यादीच्या अनुरोधाने म्हणाले असते तर मग भगवंतात विषमता, पक्षपात सिद्ध झाला असता. परंतु **"ये"** पदाने भगवंतांनी सर्वांना भजन करण्याची आणि "मी भगवंतात आहे आणि भगवंत माझ्यात आहेत" याचा अनुभव करून घेण्याची, पूर्ण स्वतंत्रता देऊन ठेवली आहे.

---

* तदपि करहि सम बिषम बिहारा।
भगत अभगत हृदय अनुसारा॥ (मानस २।२१९।३)

केवळ भगवंतातच नव्हे तर जीवन्मुक्त श्रेष्ठ महापुरुषांत सुद्धा समोर येणाऱ्याविषयी गुण, भाव, आचरण इत्यादीमुळे पक्षपात होतो—
वीतस्पृहाणामपि मुक्तिभाजां भवन्ति भव्येषु हि पक्षपाताः॥ (किराता० ३।१२)

**परिशिष्ट भाव—'समोऽहं सर्व भूतेषु'**—जीव भगवंताचा आपल्या क्रिया आणि पदार्थ अर्पण करो अथवा न करो, भगवंतात काही फरक पडत नाही. ते तर सदा समानच राहतात. कोणत्या वर्ण विशेष, आश्रमविशेष, जाती विशेष, कर्म विशेष, योग्यता विशेष इत्यादीमुळेही भगवंतावर कोणताही परिणाम होत नाही. म्हणून प्रत्येक वर्ण, आश्रम, जाती इत्यादीचा माणूस त्यांच्या सन्मुख होऊ शकतो, त्यांचा भक्त होऊ शकतो, त्यांना प्राप्त करू शकतो.

**'न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः'**—भगवंताच्या दृष्टीत भगवंताशिवाय दुसरा कोणी नाहीच, तर मग त्यांच्या द्वेष आणि प्रेम यांचा विषय दुसरा कसा होऊ शकतो? जीव हाच शुभाशुभ कर्म आणि त्यांचा फलाशी राग-द्वेष करून संसारात बांधला जातो आणि राग-द्वेषाचा त्याग करून मुक्त होतो. म्हणून बंधन आणि मुक्ती जीवाची होते, भगवंताची नव्हे. विषमता जीव करतो, भगवान् नव्हे भगवान् तर जसेच्या तसेच राहतात.

चौथ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकात भगवंताने म्हटले होते—**'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्'** तीच गोष्ट भगवंताने येथे **'ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्'** पदाने सांगितली आहे. भगवान् संपूर्ण प्राण्यात समानरूपाने परिपूर्ण आहेत, त्यांच्यात विषमता नाही. परंतु जे प्रेमपूर्वक भगवंताचे भजन करतात ते भगवंतात आहेत आणि भगवान् त्यांच्यात आहेत अर्थात् भगवान् त्यांच्यात विशेषरूपाने प्रकट आहेत. तात्पर्य हे आहे की, जसे पृथ्वीत पाणी सर्व ठिकाणी राहते परंतु विहिरीत ते विशेष प्रकट (आवरणसहित) असते, तसेच भगवान् संपूर्ण संसारात परिपूर्ण असूनही भक्तात विशेष प्रकट असतात. भक्तात ही विलक्षणता भगवंताचे प्रेमपूर्वक भजन करण्याने, भगवत्कृपेनेच आली आहे. जसे गायीच्या शरीरात असणारे तूप गायीच्या कामी येत नाही, तर तिच्या दुधापासून काढलेले तूप हेच तिच्या कामी येते. तसेच संसारात परिपूर्ण असल्याने भगवंताद्वारा लोकांचे पाप नाहीसे होत नाही, तर जे भगवंताला सन्मुख होतात, प्रेमपूर्वक त्यांचे भजन करतात, त्यांच्याच पापांचा नाश होतो.* सामान्य प्राणी भगवंताच्या अंतर्गत असूनही भगवंताला पाहत नाहीत, परंतु भक्त सर्व ठिकाणी भगवंताला पाहतात. (६। ३०) भक्त भगवंतावर प्रेम करतात आणि भगवान् भक्तांवर प्रेम करतात—**'प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः'** (गीता ७। १७). म्हणून भक्त भगवंतात आहेत आणि भगवान् भक्तात आहेत—**'मयि ते तेषु चाप्यहम्'**. तात्पर्य हे निघाले की, विषमता भगवंतात नाही. तर जे भगवंतापासून विमुख आहेत. त्या प्राण्यांनीच विषमता केली आहे.

तत्त्वाने तर भगवान् **'समोऽहं सर्वभूतेषु'** आहेत परंतु अनुभव करण्यात भगवान् **'मयि ते तेषु चाप्यहम्'** आहेत. तात्पर्य, संपूर्ण प्राण्यात समानरूपाने परिपूर्ण असूनही भगवंताचा अनुभव भक्तच करतात इतर प्राणी नव्हे. वास्तविक अनुभव करण्याची शक्तीही भगवंतापासूनच प्राप्त होते. मनुष्याचे काम केवळ भगवंताला सन्मुख होणे हे आहे.

रामायणात आले आहे—

**सातवँ सम मोहि मय जग देखा। मोते संत अधिक करि लेखा॥**

(मानस अरण्य० ३६। २)

तात्पर्य, संपूर्ण प्राण्यात भगवंताची समान व्यापकता, प्रियता कृपा आणि आत्मीयता आहे. परंतु भक्तात जे विशेष दिसून येतात. भक्तातही विशेषता भगवंतात प्रेम झाल्याने भगवत्कृपेने येते आणि ती भगवंताद्वाराच दिलेली असते. भक्तांची भगवंतात जशी तल्लीनता, प्रीती असते तशी दुसऱ्यांची असते. म्हणून भगवंताचीही भक्तात प्रियता होते. भक्त आणि भगवंताच्या परस्पर प्रियतेला 'मयि ते तेषु चाप्यहम्' पदांनी म्हटले गेले आहे.

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी "ये भजन्ति तु मां भक्त्या" पदाने भक्तिपूर्वक आपले भजन करण्याविषयी म्हटले, आता पुढील श्लोकात भजन करणारांचे विवेचन आंरभ करतात.*

## अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।
## साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥ ३०॥

**चेत्** = जर (कोणी)
**सुदुराचारः, अपि** = दुराचारातीदुराचारीही
**अनन्यभाक्** = अनन्यभक्त होऊन
**माम्** = माझे
**भजते** = भजन करतो (तर)
**सः** = त्याला
**साधुः, एव** = साधूच
**मन्तव्यः** = मानले पाहिजे
**हि** = कारण की,
**सः** = त्याने
**सम्यक्—व्यवसितः** = फार चांगल्या रीतीने निश्चय केला आहे.

* सनमुख होइ जीव मोहि जबहीं। जन्म कोटि अघ नासहिं तबहीं॥ (मानस सुन्दर० ४४। १)

*व्याख्या*— [एखादा करोडपती अथवा अरबपती हे म्हणेल की, माझ्याकडे जो कोणी येईल त्याला मी एक लाख रुपये देईन, तर त्याच्या ह्या वचनाची परीक्षा, जेव्हा त्याच्याशी सर्वथाविरुद्ध वागणारा, त्याच्याशी वैर करणारा, त्याचे अनिष्ट करणारा अशानेही त्याचेकडे येऊन त्याला एक लाख रुपयाची मागणी केली आणि त्याने त्याला दिले, तर होईल. यावरुन सर्वांना असा विश्वास होऊन जाईल की, ह्याला जो मागेल त्याला हा देतो. याच भावनेने भगवान् सर्वात प्रथम दुराचाऱ्याचे नाव घेतात.]

**अपि चेत्**—सातव्या अध्यायात आले आहे की, जे पापी असतात ते मला शरण येत नाहीत (७।१५) आणि येथे म्हटले आहे की, दुराचाराती दुराचारीही अनन्यभावाने भजन करतो—या दोन गोष्टीत परस्पर विरोध दिसतो. या विरोधाला दूर करण्यासाठीच येथे "**अपि**" आणि "**चेत्**" ही दोन पदे दिलेली आहेत. तात्पर्य, सातव्या अध्यायात "दुष्कृती मनुष्य मला शरण येत नाहीत" असे म्हणून त्यांच्या स्वभावाचे वर्णन केले आहे. परंतु तेही कोण्या एखाद्या कारणाने माझ्या भजनात लागू इच्छितील तर लागू शकतात. माझ्याकडून कोणालाही मनाई नाही.* कारण कोण्याही प्राण्याविषयी माझा द्वेषभाव नसतो. हे भाव प्रकट करण्यासाठी येथे "**अपि**" आणि "**चेत्**" पदांचा प्रयोग केला आहे.

**सुदुराचारो भजते मामनन्यभाक्**—जो अत्यंत दुराचारी आहे, जो सांगोपांग दुराचारी आहे, ज्याने दुराचाराची अंतिम मर्यादा ओलांडली आहे, ज्याने दुराचार करण्यात काहीच कमी ठेवले नाही, असाही दुराचारी जर अनन्यभावाने माझे भजन करतो तर त्याचा उद्धार होतो.

येथे "**भजते**" क्रिया वर्तमानाची आहे ज्याचा कर्ता संपूर्णपणे दुराचारी आहे. याचे तात्पर्य, पूर्वीही त्याच्याकडून दुराचार झाले आहेत आणि आता वर्तमानात तो अनन्यभावाने भजन करतो आहे, तरीही त्याचेकडून दुराचार होणे संपूर्ण-पणे कमी झालेले नसते अर्थात् कधी कधी एखाद्या परिस्थितीत पूर्व संस्कारानुसार त्याच्याकडून पाप क्रिया होऊ शकते. अशा अवस्थेतही तो माझे भजन करत असतो. कारण त्याचे ध्येय दुसरे राहिलेले नसते अर्थात् त्याचे लक्ष्य आता धन-संपत्ती, आदर-सत्कार, सुख-आराम, इत्यादी प्राप्त करण्याचे राहिलेले नसते. त्याचे एकमेव ध्येय अनन्यभावाने माझ्यातच लागण्याचे असते.

आता शंका ही येते की, असा दुराचारी अनन्यभावाने भगवंताच्या भजनात कसा प्रवृत्त होईल? त्याच्या प्रवृत्तीत अनेक कारणे होऊ शकतात जसे—

(१) तो एखाद्या संकटात सापडला आणि त्याला कोणाचाही थोडा आधार मिळाला नाही, अशा अवस्थेत त्याला एकदम ऐकलेली गोष्ट आठवते की, "भगवान् सर्वांचे सहायक आहेत आणि त्यांना शरण जाण्याने सर्व कामे ठीक होतात" इत्यादी.

(२) तो सहजच एखाद्या अशा वातावरणात गेला जेथे मोठमोठे संत महापुरुष होऊन गेले आणि आजही वर्तमानात आहेत तर त्यांच्या प्रभावाने भगवंताविषयी रुची उत्पन्न होते.

(३) वाल्मिकी, अजामेळ, सदन कसाई इत्यादी पापी-ही भगवंताचे भक्त बनलेले आहेत आणि भजनाच्या प्रभावाने त्यांच्यात विलक्षणता आली आहे—अशी एखादी कथा ऐकून पूर्वीचा एखादा चांगला संस्कार जागृत होतो, जो संपूर्ण प्राण्यांत राहत असतो.†

(४) एखादा प्राणी अशा संकटात सापडला, ज्यावेळी त्याच्या वाचण्याची मुळीच शक्यता नव्हती परंतु वाचला. अशी विशेष घटना अनुभवल्याने त्याच्या अंत:करणात हा भाव निर्माण होतो की, कोणती तरी एक विलक्षण शक्ती आहे, जी अशा भयंकर संकटातून वाचवते. ती विलक्षण शक्ती भगवान्‌च असू शकतात म्हणून आपण त्यांचेच परायण झाले पाहिजे.

(५) त्याला एखाद्या संतांचे दर्शन झाले असेल आणि त्याच्या पतन करणाऱ्या दुष्कर्माला पाहून त्याच्यावर संतांची कृपा झाली. जसे वाल्मिकी, अजामेळ इत्यादी पाप्यांवर संतांची कृपा झाली.

अशा कित्येक कारणाने जर दुराचाऱ्याचा भाव बदलला गेला तर, तो भगवंताच्या भजनात अर्थात् भगवद्भक्तीकडे वळू शकतो. चोर, डाकू, लुटणारे, हत्या करणारे, वधिक इत्यादीही एकदम भाव बदलल्याने भगवंताचे श्रेष्ठ भक्त झाले आहेत—अशा कित्येक कथा पुराणात अथवा भक्तमाल ग्रंथात आल्या आहेत.

आता एक शंका होते की, जे अनेक वर्षापासून भजन-ध्यान करत आहेत, त्यांचेही मन तत्परतेने भगवंताचे ठिकाणी स्थिर होत नाही तर मग जो दुराचाराती दुराचारी आहे त्याचे

* कोटि बिप्र बध लागहिं जाहू। आएँ सरन तजउँ नहिं ताहू॥
सनमुख होइ जीव मोहि जबहिं। जन्म कोटि अघ नासहिं तबहिं॥ (मानस ५।४४।१)

† सुमति कुमति सब के उर रहहीं। नाथ पुरान निगम अस कहहीं॥ (मानस ५।४०।३)

मन भगवंताचे ठिकाणी तैलधारवत् कसे लागेल? येथे "**अनन्यभाक्**" चा अर्थ "तो तैलधारवत् चिंतन करतो" हा नव्हे, तर याचा अर्थ आहे "**न अन्यं भजति**" अर्थात् तो इतराचे भजन करत नाही. त्याला भगवंताशिवाय अन्य कोणाचा आधार, आश्रय नसतो केवळ भगवंताचाच आश्रय असतो. जसे पतिव्रता स्त्री केवळ पतीचेच चिंतन करत असते असे नाही. तर ती तर सदा सर्वकाळ पतीचीच बनून राहते. स्वप्नात देखील ती दुसऱ्याची होत नाही. तात्पर्य तिची तर एका पतीशीच आत्मीयता असते. त्याचप्रमाणे त्या दुराचाऱ्याची केवळ भगवंताशीच आत्मीयता होते आणि एका भगवंताचाच त्याला आश्रय राहतो.

**अनन्यभाक्**—हे होण्यात मुख्य गोष्ट ही आहे "मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत" अशा प्रकारे आपल्या अहंतेला बदलून टाकणे. अहंता परिर्वतनाने जितकी लवकर शुद्धी होते, तितकी शुद्धी जप, तप, यज्ञ, दान इत्यादी क्रियेने होत नाही. या अहंता परिवर्तनाविषयी तीन गोष्टी आहेत.

(१) **अहंतेला समाप्त करणे**—ज्ञानयोगाने अहंता समाप्त होते. ज्या प्रकाशात "अहम्" (मीपणा) चे भान होते तो प्रकाश माझे स्वरूप आहे आणि एकदेशीयरूपात प्रतीत होणारा "अहम्" माझे स्वरूप नव्हे. कारण "अहम्" दृश्य असते आणि जे दृश्य असते ते आपले स्वरूप नसते. अशा प्रकारे दोन्हीचे विभाजन करून आपल्या ज्ञानाने प्राप्त झालेल्या स्वरूपात स्थित झाल्याने "अहंता" समाप्त होते.

(२) **अहंतेला शुद्ध करणे**—कर्मयोगाने अहंता शुद्ध होते. जसे पुत्र म्हणतो की, "मी पुत्र आहे आणि हे माझे पिता आहेत" तर याचे तात्पर्य केवळ पित्याची सेवा करणे माझे कर्तव्य आहे. कारण पिता पुत्राचा संबंध केवळ कर्तव्य पालनासाठीच आहे. पिता मला पुत्र मानत नसेल, मला दु:ख देत असेल, माझे अहित करत असेल, तरीही मला त्यांची सेवा करायची आहे, त्यांना सुख पोहचवायचे आहे. त्याचप्रमाणे माता, भाऊ, भावजय, पत्नी, पुत्र, परिवाराशीही मला केवळ आपल्या कर्तव्याचेच पालन करायचे आहे. त्यांच्या कर्तव्याकडे मला पहावयाचे नाही की, ते माझ्याविषयी काय करत आहेत, जगाविषयी काय करत आहेत. त्यांच्या कर्तव्याला पाहणे माझे कर्तव्य नाही. कारण दुसऱ्याच्या कर्तव्याला पाहणारा आपल्या कर्तव्यापासून च्युत होत असतो. म्हणून त्यांचा तर माझ्यावर पूर्ण अधिकार आहे, परंतु त्यांनी माझ्या अनुकूल वागावे असा माझा कोणावरही अधिकार नाही. अशा प्रकारे दुसऱ्याच्या कर्तव्याकडे न पाहता केवळ आपले कर्तव्य पालन करण्याने अहंता शुद्ध होते. कारण आपल्या सुख आरामाची कामना झाल्यानेच अहंता अशुद्ध होत असते.

(३) **अहंतेचे परिवर्तन करणे**—भक्तियोगाने अहंता बदलून जाते. जसे विवाहात पतीशी संबंध होताच कन्येची अहंता बदलून जाते आणि ती पतीच्या घरालाच आपले घर, पतीच्या धर्मालाच आपला धर्म मानू लागते. ती पतिव्रता अर्थात् एका पतीचीच होत असते तर मग ती माता-पिता, सासू सासरा इत्यादी कोणाचीही नसते. एवढेच नव्हे, ती आपल्या मुला-मुलीचीही नसते. कारण ती जेव्हा सती जाते तेव्हा ती मुला-मुलीच्या, माता-पित्याच्या स्नेहाचीही परवा करत नाही. मात्र ती पतीच्या नात्याने सर्वांची सेवा करत असते. परंतु तिची अहंता केवळ पतीचीच असते. तसेच मनुष्याची अहंता "मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत" अशा प्रकारे भगवंताशी एकरूप झाली तर त्याची अहंता बदलून जाते. या अहंतेच्या बदलण्यालाच येथे "**अनन्यभाक्**" म्हटले आहे.

**साधुरेव स मन्तव्यः**—आता एक प्रश्न निर्माण होतो की, तो पूर्वीही दुराचारी होता आणि वर्तमानातही त्याचे आचरण संपूर्णपणे शुद्ध झालेले नाही तर दुराचाराच्या दृष्टीने त्याला दुराचारी मानावे की, अनन्यभावाचा विचार करून साधूच समजावे? तर भगवान् म्हणतात की, त्याला तर साधूच मानले पाहिजे. येथे "**मन्तव्यः**" (मानले पाहिजे) विधी वचन आहे अर्थात् ही भगवंताची विशेष आज्ञा आहे.

मानण्याची गोष्ट जिथे साधुता दिसत नाही तिथेच म्हटली जाते. जर त्याचे ठिकाणी थोडेही दुराचारण नसते तर भगवान् "त्याला साधूच मानले पाहिजे" असे कशाला म्हटले असते? तर भगवंताच्या म्हणण्याने हेच सिद्ध होते की, त्यात सध्याही दुराचार आहे. तो दुराचारापासून संपूर्णपणे रहित झाला नाही. म्हणून भगवान् म्हणतात की, तो अजून संपूर्णपणे साधू झाला नाही, तरीही त्याला साधूच समजले पाहिजे. अर्थात् बाहेरुन त्याच्या आचरणात, क्रियेत एखादी कमीही दिसत असली तरीही तो असाधू नाही. याचे कारण तो "**अनन्यभाक्**" झाला आहे अर्थात् "मी केवळ भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत, मी संसाराचा नाही आणि संसार माझा नाही" अशा प्रकारे तो अंत:करणापासून भगवंताचा झाला आहे. त्याने अंत: करणातून आपली अहंता बदलून टाकली आहे. म्हणून त्याचे आचरण आता सुधरण्यास वेळ लागणार नाही, कारण अहंतेप्रमाणेच सर्व आचरण होत असते.

त्याला साधूच समजले पाहिजे असे भगवंताला का म्हणावे लागत आहे? कारण लोकांची ही रीत आहे की, ते कोणाच्या आंतरिक भावांना न पाहता बाह्य आचरण जसे असेल तसेच त्याला समजतात. जसे एखादा मनुष्य अनेक वर्षापासून परिचित आहे, अर्थात् भजन करतो, उत्तम आचरणाचा आहे, असे वीस पंचवीस वर्षापासून त्याला ओळखतो. परंतु एके दिवशी असे पाहिले की, तो रात्रीच्या वेळी एका वेश्येच्या घरातून बाहेर पडला तर त्याला पाहताच लोकांच्या मनात असे येते की पहा, याला आम्ही किती सज्जन समजत होतो परंतु हा वेश्यागामी निघाला. असा विचार येताच त्याच्याविषयी असलेला सज्जनेतचा भाव नष्ट होतो. त्याच्याविषयी जी श्रद्धा भक्ती अनेक दिवसापासून होती ती समाप्त होते. त्याचप्रमाणे एखाद्या व्यक्तीला लोक अनेक वर्षापासून जाणतात की, हा अन्यायी, पापी आहे, दुराचारी आहे आणि तोच एके दिवशी गंगेच्या काठावर स्नान करून गोमुखी घेऊन जप करत आहे. त्याचा चेहरा प्रसन्न आहे. त्याला पाहून एक जण म्हणतो की, ''पहा भगवंताचे भजन करत आहे, फार चांगला पुरुष आहे'' तर दुसरा म्हणतो की, ''अरे, तुम्ही याला जाणत नाही, मी जाणतो, हा तर असा-असा आहे. काही नाही, केवळ पाखंड करत आहे''. अशा प्रकारे भजन करत असतानाही लोक त्याला तसेच पापी मानतात आणि तिकडे साधन भजन करणाऱ्यालाही वेश्येच्या घरून निघाल्यामुळे पापी मानतात. त्याला वेश्येने कोणत्या कारणासाठी बोलावले होते कुणास ठाऊक! कदाचित दया परवश होऊन वेश्येला उपदेश करण्यासाठी गेला असेल, तिच्या कल्याणासाठी गेला असेल—याकडे त्यांची दृष्टी जात नाही. ज्याचे अंत:करण मलीन झाले आहे ते मालिन्याच्या गोष्टी करून आपल्या अंत:करणाला अधिक मलिन करतात. त्यांचे अंत:करण मलीन गोष्टीलाच ग्रहण करते. परंतु दोन्ही प्रकारच्या गोष्टी असतानाही भगवंताची दृष्टी मनुष्याच्या भावावरच राहत असते. आचरणावर नव्हे—

**रहति न प्रभु चित चूक किए की। करत सुरति सत बार हिए की''**

(मानस १।२९।३)

कारण भगवंत भावग्राही आहेत''**भावग्राही जनार्दन:**''।

**सम्यग्व्यवसितो हि स:**—दुसऱ्या अध्यायाच्या कर्मयोगाच्या प्रकरणात ''व्यवसायात्मिका बुद्धि'' ची गोष्ट आलेली आहे (२।४१) अर्थात् तेथे प्रथम बुद्धीत हा निश्चय होतो की, ''मला राग-द्वेष करायचा नाही, कर्तव्यकर्म करत सिद्धी असिद्धीत सम रहायचे आहे''. म्हणून कर्मयोग्याची बुद्धी व्यवसायात्मिका होत असते आणि येथे कर्ता स्वत: व्यवसित आहे—''**सम्यग्व्यवसित:**'' कारण ''मी केवळ भगवंताचाच आहे आता माझे काम भजन करण्याचेच आहे'' हा निश्चय स्व चा असतो, बुद्धीचा नव्हे. म्हणून सम्यक् निश्चय असणाऱ्याची स्थिती भगवंतात असते. तात्पर्य हे आहे की, तेथे निश्चय ''करण'' (बुद्धी) यात आहे आणि येथे निश्चय ''कर्ता'' (स्व) ह्यात आहे. करणात निश्चय झाला तरीही जर कर्ता परमात्मतत्त्वापासून अभिन्न होतो तर मग कर्त्यातच निश्चय झाल्यावर करणातही निश्चय होईल हे काय सांगावयाचे आहे?

जेथे बुद्धिचा निश्चय होत असतो, तेथे तो निश्चय, जोपर्यंत स्वत: कर्ता त्या निश्चयाशी संलग्न होत नाही, तोपर्यंत एकरूप होत नाही, जसे सत्संग स्वाध्यायाचे वेळी मनुष्याचा असा निश्चय होतो की, आता तर आम्ही केवळ भजन-स्मरण-च करणार. परंतु हा निश्चय सत्संगानंतर स्थिर राहत नाही. याचे कारण त्याची स्वत:ची स्वाभाविक रुची केवळ परमात्म्याकडे वळण्याची नसते तर त्याबरोबर संसाराचे सुख-आराम इत्यादी घेण्याची रुची राहते. परंतु जेव्हा स्वत:चा हा निश्चय होतो की, आता आपल्याला परमात्म्याकडेच वाटचाल करायची आहे तर मग तो निश्चय कधी विचलित होत नाही कारण तो निश्चय स्वचा असतो.

ज्याप्रमाणे कन्येचा विवाह झाल्यावर ''आता मी पतीची झाले. आता मला पतीच्या घरचे कामच करायचे आहे'' असा **निश्चय स्व मध्ये झाल्याने तिचा हा निश्चय कधी नष्ट होत नाही, तर स्मरण न करता नित्य कायम राहतो. याचे कारण तिने स्व** लाच पतीचे मानले असते. त्याचप्रमाणे जेव्हा मनुष्य हा निश्चय करतो की, ''मी भगवंताचा आहे आणि आता केवळ भगवंताचेच काम (भजन) करायचे आहे, भजनाशिवाय इतर कोणतेही काम नाही. कोणत्याही इतर कामाशी काहीही कर्तव्य नाही.'' तर हा निश्चय स्व चा असल्याने नेहमीसाठी पक्का होतो नंतर तो कधी नष्ट होतच नाही. म्हणून भगवान् म्हणतात की, त्याला साधूच मानले पाहिजे. केवळ मानण्याचीच गोष्ट नव्हे, स्वचा निश्चय असल्याने तो फार लवकर धर्मात्मा बनतो—''**क्षिप्रं भवति धर्मात्मा**'' (९।३१)

भक्तियोगाच्या दृष्टीने संपूर्ण दुर्गुण दुराचार भगवंताच्या विमुखतेवरच टिकून राहतात. जेव्हा प्राणी अनन्यभावाने भगवंताला सम्मुख होतो, तेव्हा सर्व दुर्गुण-दुराचार नष्ट होत असतात.

**परिशिष्ट भाव**—ज्ञानयोग आणि कर्मयोग यात बुद्धीची प्रधानता राहते—'**एषा तेऽभिहिता साङ्ख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु**'

(गीता २।३९). म्हणून ज्ञानयोगी आणि कर्मयोगी यांची बुद्धी व्यवसित असते—'**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह**' (गीता २।४१), '**व्यवसायात्मिका बुद्धिः**' (गीता २।४४). परंतु भक्तियोगात स्वची प्रधानता असते. म्हणून भक्त स्वतः व्यवसित असतो—'**सम्यग्व्यवसितो हि सः**'.

मन-बुद्धीत बसलेल्या विषयाचे विस्मरण होऊ शकते परंतु स्वमध्ये बसलेल्या विषयांचे विस्मरण होऊ शकत नाही. कारण मन-बुद्धी आपल्याबरोबर निरंतर राहत नाहीत. सुषुप्तीत आपल्याला त्यांच्या अभावाचा अनुभव येतो परंतु स्वच्या अभावाचा अनुभव कधी कोणाला येत नाही. त्या स्वमध्ये जो विषय असतो तो अखंड राहतो. म्हणून 'मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत'—ही स्वीकृती स्वमध्ये असते, मन-बुद्धीत नव्हे. एकदा का स्वीकृती झाली तर मग कधी अस्वीकृती होतच नाही. कारण स्व मूळात भगवंताचाच अंश असल्याने भगवंताशी अभिन्न आहे. परंतु हा अज्ञानाने प्रकृतीशी आपला संबंध स्वीकार करतो (गीता १५।७). म्हणून वास्तविक केवळ आपले अज्ञानच समाप्त होते. अज्ञानाचा नाश होताच भगवंताच्या नित्यसंबंधाची आपोआप जागृती होते—'**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा**' (गीता १८।७३). दुसऱ्याशी संबंध मानला होता तेच अज्ञान होते, मोह होता.

*__संबंध__—आता पुढील श्लोकात सम्यक् निश्चयाचे फल सांगतात.*

## क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।
## कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति॥ ३१॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **क्षिप्रम्** | = (तो) तात्काळ (त्याच क्षणी) | **शश्वत्** | = निरंतर राहणाऱ्या | **मे** | = माझ्या |
| **धर्मात्मा** | = धर्मात्मा | **शान्तिम्** | = शांतीला | **भक्तः** | = भक्ताचे |
| **भवति** | = होतो (आणि) | **निगच्छति** | = प्राप्त होतो | **प्रणश्यति, न** | = पतन होत नाही |
| | | **कौन्तेय** | = हे कुन्तीनंदन! | **प्रतिजानीहि** | = (अशी तू) प्रतिज्ञा कर. |

*__व्याख्या__*—**क्षिप्रं भवति धर्मात्मा**—तो तात्काळ धर्मात्मा होतो अर्थात् महान् पवित्र होतो कारण हा जीव स्वतः परमात्म्याचा अंश आहे आणि जेव्हा याचा उद्देशच परमात्म्याच्या प्राप्तीचा होतो तर आता त्याच्या धर्मात्मा होण्यास कशाला उशीर लागेल? आता तो पापात्मा कसा राहील? कारण तो धर्मात्मा तर स्वतः होताच केवळ संसाराच्या संबंधाने, त्याच्याठिकाणी पापात्मेपणा आला होता, जो आगंतुक होता. आता अहंता बदलल्याने संसाराचा संबंध राहिला नाही त्यामुळे तो जसाच्या तसा (धर्मात्मा) राहिला.

हा जीव जेव्हा पापात्मा बनला नव्हता, तेव्हाही पवित्र होता आणि जेव्हा पापात्मा बनला तेव्हाही तसाच पवित्र होता. कारण परमात्म्याचा अंश असल्याने जीव नेहमीच पवित्र असतो. केवळ संसाराच्या संबंधाने तो पापात्मा बनला होता. संसाराचा संबंध सुटताच तो जसाच्या तसा पवित्र राहिला.

पापाची भावना राहिली असताना मनुष्य "मला केवळ भगवंताकडे वाटचाल करावयाची आहे" असा निश्चय करू शकत नाही—ही गोष्ट बरोबर आहे. परंतु पापी मनुष्य असा निश्चय करू शकत नाही, असा काही नियम नाही. कारण सर्व जीव परमात्म्याचे अंश असल्याने तत्त्वतः निर्दोष आहेत. संसाराच्या आसक्तीमुळेच त्यात आगंतुक दोष येतात. जर त्याच्या मनात पापाविषयी घृणा निर्माण झाली आणि असा निश्चय झाला की, आता भगवंताचेच भजन करायचे आहे तर तो फार लवकर धर्मात्मा बनतो. कारण जेथे संसाराची कामना असते तेथेच भगवद्भक्तीची रुचीही असते. जर भगवद्भक्तीची रुची दृढ होईल तर कामना, आसक्ती नष्ट होत असते. मग भगवत्प्राप्तीमध्ये उशीर लागू शकत नाही.

तो फार लवकर धर्मात्मा होतो. याचे तात्पर्य त्याचे ठिकाणी जे थोडे दुराचार दिसतात तेही टिकणारे नाहीत. कारण सर्वचे सर्व दुराचार संसाराला दिलेल्या महत्त्वावर टिकून असतात. परंतु जेव्हा तो संसारात कामनारहित होऊन केवळ भगवंताचीच इच्छा करतो, तेव्हा त्याच्या अंतःकरणात संसाराचे महत्त्व न राहता केवळ भगवंताचेच महत्त्व कायम राहते. भगवंताचे महत्त्व कायम असल्याने तो धर्मात्मा होतो.

### मार्मिक गोष्ट

हा एक सिद्धांत आहे की, कर्ता बदलला असताना क्रिया आपोआप बदलतात. जसे एखादा धर्मरूपी क्रिया करून धर्मात्मा होऊ इच्छितो तर त्याला धर्मात्मा होण्याला उशीर लागेल. परंतु त्याने जर कर्त्यालाच बदलून टाकले अर्थात् "मी धर्मात्मा आहे" अशा आपल्या अहंतेलाच बदलून टाकले तर तो फार लवकर धर्मात्मा बनेल. त्याच-प्रमाणे दुराचाराती दुराचाऱ्यानेही "मी भगवंताचा आहे आणि

भगवंत माझे आहेत.'' अशा आपल्या अहंतेला बदलून टाकले, तर तो फार लवकर धर्मात्मा होत असतो, साधू होतो, भक्त होतो. तात्पर्य, मनुष्य जेव्हा शरीर संसाराशी ''मी'' आणि ''माझेपणा'' करून संयोगजन्य सुखाची इच्छा करतो, तेव्हा तो कामात्मा बनतो. (२।४३) आणि जेव्हा संसाराला संपूर्णपणे विमुख होऊन भगवंताशी अनन्यसंबंध जोडून घेतो, जो वास्तविक आहे, तेव्हा तो ''धर्मात्मा'' बनतो.

सामान्य दृष्टीने लोक हेच समजतात की, मनुष्य सत्य बोलण्याने सत्यवादी होतो आणि चोरी करण्याने चोर होतो. परंतु वास्तविक ही गोष्ट नसते. जेव्हा स्व सत्यवादी असतो अर्थात् ''मी सत्य बोलणारा आहे'' अशा अहंतेला आपल्यात ग्रहण करतो तेव्हा तो सत्य बोलतो आणि सत्य बोलण्याने त्याची सत्यवादिता दृढ होते. तसेच जो चोर असतो तो ''मी चोर आहे'' अशा अहंतेला ग्रहण करूनच चोरी करतो आणि चोरी करण्याने त्याच्या चौर्यपणात दृढता येते. ज्याच्या अहंतेत ''मी चोरच नाही'' असा दृढ भाव राहतो तो चोरी करू शकत नाही तात्पर्य, अहंतेच्या परिवर्तनाने क्रियेचे परिवर्तन होत असते.

या दोन्ही दृष्टांताने हे सिद्ध झाले की, कर्ता जसा असतो, त्याच्याकडून तशीच कर्म होत असतात आणि जशी कर्म होतात तसेच त्याचा कर्तेपणा दृढ होत जातो. त्याच-प्रमाणे दुराचाऱ्यानेही ''**अनन्यभाक्**'' होऊन अर्थात् ''मी केवळ भगवंताचा आहे आणि केवळ भगवंतच माझे आहेत'' अशा अनन्यभावाने भगवंताशी संबंध जोडून घेतला तर, त्याच्या अहंतेत ''मी भगवंताचा आहे संसाराचा नव्हे'' हा भाव दृढ होतो जो वास्तविक सत्य आहे, अशा प्रकारे अहंता बदलल्याने क्रियेत थोडीशी कमी राहिली तरी तो फार लवकर धर्मात्मा बनतो.

येथे शंका होऊ शकते की, पूर्व श्लोकात भगवान् ''**सुदुराचारः**'' म्हणाले आहेत तर मग येथे भगवंतांनी त्याला ''धर्मात्मा'' का म्हटले? याचे समाधान असे आहे की, दुराचाऱ्याचे दुराचार समाप्त झाल्यास तो सदाचारी अर्थात् धर्मात्माच बनेल. म्हणून सदाचारी म्हणा अथवा धर्मात्मा म्हणा एकच गोष्ट आहे.

**शश्वच्छान्तिं निगच्छति**—जो केवळ धार्मिक क्रियेने धार्मिक बनतो त्याच्या अंतःकरणात भोग आणि ऐश्वर्याची कामना असल्याने त्याला भोग आणि ऐश्वर्य तर मिळू शकते परंतु शाश्वत शांती मिळू शकत नाही. दुराचाऱ्याची अहंता बदलल्यावर जेव्हा तो भगवंताशी अंतःकरणातून एक होतो, तेव्हा त्याच्या अंतःकरणात कामना राहू शकत नाही, असत्चे महत्त्व राहू शकत नाही म्हणून त्याला शाश्वत राहणारी शांती मिळते.

दुसरा भाव असा आहे की, स्वतः परमात्म्याचा अंश असल्याने ''**चेतन अमल सहज सुखरासी**'' आहे. म्हणून त्यात आपल्या स्वरूपाची जी अनादी अनंत स्वतःसिद्ध शांती असते, धर्मात्मा झाल्याने अर्थात् भगवंताशी अनन्यभावाने संबंध झाल्याने ती शाश्वत शांती त्याला प्राप्त होते. केवळ संसाराशी सबंध मानल्यानेच त्याचा अनुभव येत नव्हता.

**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति**—येथे ''माझ्या भक्ताचे पतन होत नाही'' अशी प्रतिज्ञा भगवंत अर्जुनाकडून करवितात, स्वतः करत नाहीत. याचा आशय असा आहे की, आता युद्धाचा आरंभ होणार आहे आणि भगवंतांनी पूर्वीच हातात शस्त्र न घेण्याची प्रतिज्ञा केली आहे परंतु जेव्हा पुढे भीष्माचार्य ही प्रतिज्ञा करतील की ''**आजु जौ हरिहिं न सस्त्र गहाऊँ। तौ लाजौं गङ्गा जननीको शान्तनु सुत न कहाऊँ॥**'' त्यावेळी भगवंताची प्रतिज्ञा भंग होऊन जाईल, परंतु भक्ता (भीष्माचार्य) ची प्रतिज्ञा भंग होणार नाही. भगवंतांनी चौथ्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात ''**भक्तोऽसि मे सखा चेति**'' म्हणून अर्जुनाला आपला भक्त स्वीकार केले आहे. म्हणून अर्जुनाला म्हणतात की, 'हे सख्या! तू प्रतिज्ञा कर कारण तुझ्याकडून प्रतिज्ञा झाल्यावर जर मी स्वतःही तुझी प्रतिज्ञा भंग करू इच्छिल, तरीही भंग करू शकणार नाही, मग दुसरा भंग करीलच कोण?'' तात्पर्य, जर भक्ताने प्रतिज्ञा केली तर, त्या प्रतिज्ञेच्या विरुद्ध माझी प्रतिज्ञाही काम करणार नाही.

माझ्या भक्ताचा विनाश अर्थात् पतन होत नाही हे म्हणण्याचे तात्पर्य, जर तो माझ्या संपूर्णपणे सम्मुख झाला आहे तर आता त्याच्या पतनाची थोडीही शक्यता राहत नसते. पतनाचे कारण तर शरीराशी आपला संबंध मानणेच होते. त्या मानलेल्या संबंधापासून संपूर्णपणे विमुख होऊन जेव्हा तो अनन्यभावाने माझ्या सम्मुख झाला तर, त्याच्या आता पतनाची शक्यता होऊच कशी शकते?

दुराचारीही जर भक्त होऊ शकतो तर मग भक्त झाल्यावर तो पुन्हा दुराचारीही होऊ शकतो—असे न्याय म्हणातो. हा तर्क दूर करण्यासाठी भगवान् म्हणतात की, हा न्याय येथे लागू शकत नाही. माझे तर दुराचाराती दुराचारी भक्त होऊ शकतात परंतु भक्त झाल्यावर त्यांचे पुन्हा पतन होऊ शकत नाही अर्थात् ते दुराचारी पुन्हा बनू शकत नाहीत. अशा प्रकारे भगवंताच्या न्यायातही दया भरलेली आहे. म्हणून भगवान् न्यायकारी आणि दयाळू दोन्हीही सिद्ध होतात.

**परिशिष्ट भाव**—जसे रोग्याचा वैद्याची संबंध होतो तसेच आपल्या निर्बलतेचा आणि भगवंताच्या सर्व समर्थतेचा विश्वास झाल्यावर मनुष्याचा भगवंताशी संबंध होतो. तात्पर्य, जेव्हा मनुष्य सांसारिक दुःखाने घाबरून जातो आणि त्यांना मिटविण्यात आपल्या निर्बलतेचा अनुभव करतो, त्याच बरोबर त्याच्यात असा विश्वास असतो की, सर्वसमर्थ भगवंताच्या कृपाशक्तीने माझी ही निर्बलता दूर होऊ शकते, मी सांसारिक दुःखांपासून वाचू शकतो, तेव्हा तो तात्काळ 'भक्त' होतो—'**क्षिप्रं भवति धर्मात्मा**'. भुकेल्या व्यक्तीला अन्न मिळाले तर भोजन करण्यात उशीर लागेल?

जोपर्यंत मनुष्याला आपल्यात काही बल, योग्यता, विशेषता दिसते तोपर्यंत तो 'अनन्यभाक्' नसतो. तो 'अनन्यभाक्' तेव्हाच होतो जेव्हा त्याला दुसरा कोणी दुःख नाश करणारा दिसत नाही. 'अनन्यभाक्' होताच तो धर्मात्मा अर्थात् भगवंताचा भक्त होतो.

भक्ताचे पतन होत नाही कारण तो भगवन्निष्ठ असतो अर्थात् त्याचे साधन आणि साध्य भगवान्‌च असतात. त्याचे स्वतःचे बळ नसते तर भगवंताचेच बळ असते. येथे शंका येऊ शकते की, जर भक्ताचे पतन होत नाही तर भगवंताने अठराव्या अध्यायात अर्जुनाला '**अथ चेत्त्वमहङ्कारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि**' (१८।५८) 'जर तू अहंकारामुळे माझी गोष्ट ऐकली नाहीस तर तुझे पतन होईल'—असे का म्हटले? जर भगवान् अर्जुनाला आपला भक्तही मानतात—'**भक्तोऽसि मे सखा चेति**' (गीता ४।३) याचे समाधान असे आहे की, भक्ताचे पतन तेव्हाच होऊ शकते, जेव्हा तो भगवंताचा आश्रय सोडून अहंकाराचा आश्रय घेतो—'**अहङ्कारान्न श्रोष्यसि**'. भगवंताचा आश्रय राहिल्यास त्याचे पतन होऊ शकत नाही.

भक्त भगवंताचे तान्हे बालक आहेत आणि ज्ञानी मोठे बालक आहेत. जसे मातेला लहान-मोठे सर्व बालक समानरूपाने प्रिय असतात परंतु सांभाळ मात्र तान्ह्या बालकाचाच करते, मोठ्याचा नाही. कारण तान्हे बालक संपूर्णपणे मातेच्याच आश्रित असते. म्हणून त्याच्या संरक्षणाची जितकी आवश्यकता असते तितकी मोठ्याला आवश्यकता नसते. तसेच भगवान् आपल्या आश्रित असलेल्या भक्ताचे पूर्ण रक्षण करतात आणि स्वतः त्याचे योगक्षेम वहन करतात (गीता ९।२२). परंतु ज्ञानीच्या योग-क्षेमाचे वहन कोण करील? म्हणून ज्ञानाचा साधक तर योगभ्रष्ट होऊ शकतो परंतु भक्त योगभ्रष्ट होऊ शकत नाही.

ब्रह्मादी देवता भगवंताला म्हणतात—

**येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिनस्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः।**
**आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः पतन्त्यधोऽनादृतयुष्मदङ्घ्रयः॥**

(श्रीमद्भा० १०।२।३२)

'हे कमलनयन! जे लोक आपल्या चरणी शरण होत नाहीत आणि आपल्या भक्तिरहित असल्यामुळे ज्यांची बुद्धीही शुद्ध नसते, ते स्वतःला तर मुक्त मानतात परंतु ते वास्तविक बद्धच आहेत. ते जरी कष्टपूर्वक साधन करून उच्चाती उच्च पदावरही पोहचले तरीही तेथून त्यांचे पतन होते.'

**तथा न ते माधव तावकाः क्वचिद् भ्रश्यन्ति मार्गात्त्वयि बद्धसौहृदाः।**
**त्वयाभिगुप्ता विचरन्ति निर्भया विनायकानीकपमूर्धसु प्रभो॥**

(श्रीमद्भा० १०।२।३३)

'परंतु भगवन्! जे आपले भक्त आहेत, ज्यांनी आपल्या चरणी स्वतःची वास्तविक प्रीती जोडली आहे, ते कधी त्या ज्ञानाभिमान्यासारखे आपल्या साधनेपासून पतित होत नाहीत. प्रभो! आपल्याद्वारा सुरक्षित झाल्यामुळे ते मोठ-मोठे विघ्न करणाऱ्या सेनेच्या सरदारांच्या डोक्यावर पाय देऊन निर्भय होऊन विचरतात, कोणतेही विघ्न त्यांच्या मार्गात अडथला निर्माण करू शकत नाही.'

भगवंताची स्तुती करताना वेद म्हणतात—

**जे ग्यान मान बिमत्त तव भव हरनि भक्ति न आदरी।**
**ते पाइ सुर दुर्लभ पदादपि परत हम देखत हरी॥**
**बिस्वास करि सब आस परिहरि दास तव जे होइ रहे।**
**जपि नाम तव बिनु श्रम तरहिं भव नाथ सो सम रामहे॥**

(मानस उत्तर० १३।३)

ज्ञानयोगाच्या साधकात थोडी उणीव राहिल्यास पतन होऊ शकते परंतु भक्तियोगाच्या साधकात थोडी उणीव राहिली तरीही पतन होत नाही. म्हणून भगवान् म्हणतात—

**बाध्य मानोऽपि मद्भक्तो विषयैरजितेन्द्रियः।**
**प्रायः प्रगल्भया भक्त्या विषयैर्नाभिभूयते॥**

(श्रीमद्भा० ११।१४।१८)

'उद्धवजी! माझा जो भक्त अजून जितेंद्रिय होऊ शकला नाही आणि संसाराचे विषय त्याला वारंवार बाधा पोहोचवित राहतात, आपल्याकडे आकर्षित करीत राहतात तरीही तो प्रतिक्षण वर्धमान असलेल्या माझ्या भक्तीच्या प्रभावाने सहसा विषयांकडून पराजित होत नाही.'

**न वासुदेव भक्तानामशुभं विद्यते क्वचित्।** (महाभारत, अनु० १४९। १३१)

'भगवंताच्या भक्तांचे कुठेही कधीही अशुभ होत नाही.'

**सीम की चाँपि सकइ कोउ तासू। बड रखवार रमापति जासू॥**

(मानस बाल० १२६। ४)

**'कौन्तेय प्रतिजानीहि'**—भगवान् अर्जुनाला प्रतिज्ञा करण्यासाठी सांगतात. कारण भक्तांची प्रतिज्ञा भगवान्सुद्धा टाळू शकत नाहीत. भक्ती भगवंताची कमजोरी आहे. म्हणून भगवान् दुर्वास ऋषींना म्हणतात—

**अहं भक्तपराधीनो ह्यस्वतंत्र इव द्विज।**
**साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः॥** (श्रीमद्भा० ९।४।६३)

'हे द्विज! मी भक्तांच्या सर्वथा अधीन आहे, स्वतंत्र नाही. मला भक्तजन फारच प्रिय आहेत. त्यांचा माझ्या हृदयावर पूर्ण अधिकार आहे.'

**'कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति'**—या पदांनुसार साधकांनी असा दृढ विश्वास करावा की, माझे पतन होऊच शकत नाही, कारण मी भगवंताचा आहे.

***संबंध****—या प्रकरणात भगवंतांनी आपल्या भक्तीचे सात अधिकारी सांगितले आहेत. त्यापैकी दुराचाऱ्याचे वर्णन दोन श्लोकांत केले. आता पुढील श्लोकात भक्तीच्या चार अधिकाऱ्यांचे वर्णन करतात.*

## मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।
## स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥ ३२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **स्त्रियः** | = स्त्रीया, | **माम्,** | = सर्वथा मला |
| **ये** | = जे | **वैश्याः** | = वैश्य | **व्यपाश्रित्य** | शरण होऊन |
| **अपि** | = कोणी | **तथा** | = आणि | **हि** | = निःसंदेह |
| **पापयोनयः** | = पापयोनीवाले | **शूद्राः** | = शूद्र | **पराम्** | = परम |
| **स्युः** | = असतील | | (असतील) | **गतिम्** | = गतीला |
| | (आणि जे कोणी) | **ते, अपि** | = तेही | **यान्ति** | = प्राप्त होतात. |

***व्याख्या*—मां हि पार्थ व्यपाश्रित्य......यान्ति परां गतिम्**—ज्यांचे या जन्मात आचरण वाईट आहे अर्थात् जो या जन्माचा पापी आहे, त्याला भगवंताने तीसाव्या श्लोकात ''दुराचारी'' म्हटले आहे. ज्यांचे पूर्वजन्माचे आचरण वाईट होते अर्थात् जे पूर्वजन्माचे पापी आहेत आणि आपल्या मागील पापांचे फल भोगण्यासाठी नीच योनीत उत्पन्न झाले आहेत त्यांना भगवंतांनी येथे ''पापयोनी'' म्हटले आहे.

येथे ''पापयोनी'' शब्द असा व्यापक आहे की, ज्यात असुर, राक्षस, पशू, पक्षी इत्यादी सर्व घेतले जाऊ शकतात.* आणि हे सर्व भगवद्भक्तीचे अधिकारी मानले जातात. शाण्डिल्य ऋषींनी म्हटले आहे **''आनिन्द्ययोन्यधिक्रियते पारम्पर्यात् सामान्यवत्''**. (शाण्डिल्य भक्तिसूत्र ७८) अर्थात् जसे दया, क्षमा, उदारता इत्यादी सामान्य धर्माची सर्व माणसे अधिकारी आहेत तसेच, नीचाती-नीच योनीपासून उच्चाती-उच्च योनीपर्यंत सर्व प्राणी भगवद्भक्तीचे अधिकारी आहेत. याचे कारण असे आहे की, मात्र जीव भगवंताचे अंश असल्याने भगवद्भक्ती करण्यात, भगवदाज्ञानुसार कर्म करण्यात, भगवंताला सम्मुख होण्यात अनधिकारी नाहीत. प्राण्यांची योग्यता-अयोग्यता इत्यादी तर सांसारिक कार्यात असते कारण ह्या योग्यता इत्यादी बाह्य आहेत आणि मिळालेल्या आहेत तसेच जाणाऱ्या आहेत. म्हणून भगवंताशी संबंध

* केवलेन हि भावेन गोप्यो गावो नगा मृगाः। येऽन्ये मूढधियो नागाः सिद्धा मामीयुरञ्जसा॥ (श्रीमद्भा० ११।१२।८)
''गोपी, गायी, वृक्ष, पशू, नाग तसेच अशा प्रकारचे आणखीही मूढबुद्धी प्राण्यांनी अनन्यभावाने सिद्ध होऊन सहजच माझी प्राप्ती करून घेतली आहे.''

जोडण्यात योग्यता-अयोग्यता कोणतेच कारण नसते अर्थात् ज्यात योग्यता आहे तो भगवद्भक्ती करू शकतो आणि ज्यात अयोग्यता असते तो भगवद्भक्ती करू शकत नाही असे नाही. प्राणी स्वत: भगवंताचे आहेत. म्हणून सर्व भगवंताला सम्मुख होऊ शकतात. तात्पर्य ज्यांना अंत:करणातून भगवंत प्रिय असतात ते सर्व भगवद्भक्तीचे अधिकारी आहेत. असे पापयोनीवालेसुद्धा भगवंताला शरण होऊन परमगतीला प्राप्त होतात. परम पवित्र होतात.

लौकिक दृष्टीने तर आचरण भ्रष्ट असल्याने अपवित्रता मानली जाते परंतु वास्तविक जी काही अपवित्रता येत असते ती सर्वची सर्व भगवंताला विमुख होण्यानेच येत असते. जसा विस्तव अग्नीपासून विमुख होताच कोळसा बनतो. मग त्या कोळशाला साबण लावून कितीही धुतले तरीही त्याचा काळेपणा नष्ट होत नाही. जर पुन्हा त्याला अग्नीत ठेवले तर मग त्याचा काळेपणा राहत नाही आणि तो चमकू लागतो. तसेच भगवंताचा अंश असलेल्या या जीवात काळेपणा अर्थात् अपवित्रपणा भगवंताला विमुख झाल्यानेच येत असतो. जर हा भगवंताला सम्मुख झाला तर याची सर्व अपवित्रता संपूर्णपणे समाप्त होत असते आणि हा महान् पवित्र बनतो आणि जगात चमकून उठतो. याचे ठिकाणी इतकी पवित्रता येत असते की, भगवंतही याला आपले मुकुटमणी बनवितात.

जेव्हा स्व आर्त स्वराने प्रभूचा धावा करतो तर त्या क्रियेत भगवंताला द्रवित करण्याची जी शक्ती आहे ती शक्ती शुद्ध आचरणात नसते. जसे आईचा एक मुलगा चांगले काम करत असतो, तर आई त्याच्याशी प्रीती ठेवते आणि एक मुलगा काहीही काम करत नाही तर आर्त स्वरात आईचा धावा करतो. जोराने आक्रोश करतो त्यावेळी आई असा विचार करत नाही की, हा तर काहीही काम करत नाही, याला कशाला मांडीवर घेऊ? ती त्याचे अक्रोश करणे सहन करू शकत नाही आणि एकदम त्याला मांडीवर, खांद्यावर घेत असते. तसेच वाईटात वाईट आचरण करणारा, पाप्यातला पापी व्यक्तीही जेव्हा आर्त स्वरात भगवंताचा धावा करतो, रडतो, त्यावेळी भगवंत त्याला आपल्या मांडीवर घेतात, त्याच्यावर प्रेम करतात. यावरुन हे सिद्ध झाले की, स्व भगवंताकडे सम्मुख झाल्यावर जर या जन्माचे पापही बाधा देऊ शकत नाही तर मग मागील जन्माचे पाप बाधा कसे देऊ शकेल? कारण मागील पापकर्माचे फल जन्म आणि भोगरूप प्रतिकूल परिस्थिती आहे. म्हणून ते भगवद्भक्ती करण्यात बाधा देऊ शकत नाही.

या ठिकाणी "**स्त्रिय:**" देण्याचे तात्पर्य, कोणत्याही वर्णाच्या, कोणत्याही आश्रमाच्या, कोणत्याही देशाच्या, कोणत्याही वेशाच्या कशाही स्त्रीया का असेनात , त्या सर्व मला शरण होऊन परम पवित्र बनतात आणि परमगतीला प्राप्त होतात. जसे प्राचीन काळात देवहूती, शबरी, कुंती, द्रौपदी, व्रजगोपी इत्यादी आणि वर्तमान काळात मीराबाई, करमीतीबाई, करमाबाई, फूलीबाई इत्यादी कितीतरी स्त्रीया भगवंताच्या भक्त झाल्या आहेत. तसेच वैश्यात समाधी, तुलाधार इत्यादी आणि शूद्रात विदुर, संजय, निषादराज गुह इत्यादी कित्येक भगवंताचे भक्त झाले आहेत. तात्पर्य पापयोनी,स्त्रीया, वैश्य आणि शूद्र हे सर्व भगवंताचा आश्रय घेऊन परमगतीला प्राप्त होतात.

### विशेष गोष्ट

या श्लोकात "**पापयोनय:**" स्वतंत्ररूपाने आले आहे. ह्या पदाला स्त्रीया, वैश्य आणि शूद्र यांचे विशेषण मानले जाऊ शकत नाही. कारण असे मानले तर पुष्कळशा अडचणी निर्माण होतात. स्त्रीया चारी वर्णाच्या असतात. त्यापैकी ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांच्या स्त्रीयांना पतीबरोबर यज्ञ इत्यादिक वैदिक कर्मात बसण्याचा अधिकार आहे म्हणून स्त्रीयांना पापयोनी कसे म्हणता येणे शक्य आहे? अर्थात् म्हणू शकत नाहीत. चारी वर्णात येत असतानाही भगवंतांनी स्त्रीयांचे नाव वेगळे घेतले आहे.याचे तात्पर्य स्त्रीया पतीच्या साथीनेच माझा आश्रय घेऊ शकतात, माझ्याकडे वळू शकतात—असा काही नियम नाही. स्त्रीया स्वतंत्रतेने माझा आश्रय घेऊन परमगतीला प्राप्त होऊ शकतात. म्हणून स्त्रीयांनी कोणत्याही व्यक्तीचा मनाने थोडाही आश्रय न घेता केवळ माझाच आश्रय घेतला पाहिजे.

जर हे "**पापयोनय:**" वैश्याचे विशेषण मानले, तर तेही युक्तिसंगत होत नाही. कारण श्रुतिनुसार वैश्यांना पापयोनी मानले जाऊ शकत नाही.* वैश्यांना वेद शिकण्याचा आणि यज्ञ करण्याचा पूर्ण अधिकार दिला गेला आहे.

जर या "**पापयोनय:**" पदाला शूद्राचे विशेषण मानले तर तेही युक्तिसंगत होत नाही. कारण शूद्र तर चारी वर्णात येतात. म्हणून चारी वर्णाच्या व्यतिरिक्त अर्थात् शूद्रापेक्षाही

* तद्य इह रमणीयचरणा अभ्याशो ह यत्ते रमणीयां योनिमापद्येरन् ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वाथ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिमापद्येरञ्श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चाण्डालयोनिं वा (छान्दोग्य० ५।१०।७) अर्थात् जे चांगल्या आचरणांचे आहेत, त्यांचा जन्म तर ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्यात होतो, परंतु जे नीच आचरणाचे आहेत ते कुत्रे, डुक्कर तसेच चांडालयोनीत जन्म घेतात.

जे हीन जातीचे यवन, हूण खस इत्यादी माणसे आहेत, त्यांनाच "**पापयोनयः**" पदाच्या अंतर्गत घेतले पाहिजे.

जसे आईच्या मांडीवर बसण्यासाठी बाळाला मनाई नसते कारण ते बाळ आईचेच असते. तसेच भगवंताचा अंश असल्याने संपूर्ण प्राण्यांना (भगवंताकडून) भगवद्भक्ती करण्यास कसलीच मनाई नाही. पशू, पक्षी, वृक्ष, लता इत्यादीत भगवद्भक्ती करण्याची समज, योग्यता नसते, तरी पण पूर्व जन्माच्या संस्कारानुसार अथवा अन्य कोणत्या कारणाने ते भगवंताला सम्मुख होऊ शकतात. म्हणून येथे "**पापयोनयः**" पदात पशू, पक्षी, इत्यादीलाही अपवादरूपाने घेता येणे शक्य आहे. पशू, पक्ष्यात गजेंद्र जटायू, इत्यादी भगवद्भक्त झालेले आहेत.

**मार्मिक गोष्ट**

भगवंताकडे वाटचाल करण्यात भावाची प्रधानता असते, जन्माची नव्हे. ज्याच्या अंत:करणात जन्माची प्रधानता असते त्याच्या ठिकाणी भावाची प्रधानता नसते आणि त्याच्यात भगवद्भक्तीही उत्पन्न होत नाही. कारण जन्माची प्रधानता मानणाऱ्यांच्या "अहम्" मध्ये शरीराचा संबंध राहतो, जो भगवंताकडे वळू देत नाही. अर्थात् शरीर भगवद्भक्त होत नसते आणि भक्त शरीर नसते तर "स्व" भक्त असतो. त्याचप्रमाणे जीव ब्रह्माला प्राप्त होऊ शकत नाही, तर ब्रह्मच ब्रह्माला प्राप्त होत असते, अर्थात् ब्रह्ममध्ये जीवभाव नसतो आणि जीवभावात ब्रह्मभाव नसतो. जीव तर प्राणाच्या अनुषंगाने आहे आणि ब्रह्मात प्राण नसतात. म्हणून ब्रह्मच ब्रह्माला प्राप्त होत असते अर्थात् जीवभाव समाप्त होऊनच ब्रह्माला प्राप्त होत असतो. "**ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति**" (बृहदारण्यक० ४।४।६)

स्व मध्ये शरीराचा अभिमान नसतो. जेथे स्व मध्ये शरीराचा अभिमान असतो तेथे "मी शरीराहून वेगळा आहे" हा विवेक राहत नाही, तर तो हाड मांसाचे, मल-मूत्र उत्पन्न करणाऱ्या मशीनचाच दास (गुलाम) होत असतो. हाच अविवेक आहे, अज्ञान आहे. याप्रमाणे अविवेकाची प्रधानता असल्याने या मनुष्याचा भक्तिमार्गातही प्रवेश होऊ शकत नाही. म्हणून शरीराच्या अनुषंगाने जो व्यवहार असतो तो लौकिक मर्यादेसाठी फार आवश्यक असतो आणि त्या मर्यादेनुसार चालल्लेही पाहिजे. परंतु भगवंताकडे सम्मुख होण्यात, स्वची मुख्यता असते, शरीराची नव्हे.

तात्पर्य जो भक्ती आणि मुक्तीची इच्छा करतो, तो स्व असतो शरीर नव्हे.जरी तादात्म्यामुळे स्व शरीर धारण करत राहतो परंतु स्व केव्हाही शरीर होऊ शकत नाही आणि शरीर केव्हाही स्व होऊ शकत नाही. स्व स्वच असते आणि शरीर शरीरच राहते. स्वची परमात्म्याशी एकता आहे आणि शरीराची संसाराशी एकता आहे. जोपर्यंत शरीराशी तादात्म्य राहते तोपर्यंत तो भक्तिचाही आणि ज्ञानाचाही अधिकारी होत नाही. तसेच संपूर्ण शंकांचे समाधानही करू शकत नाही. ते शरीराचे तादात्म्य, भावाने समाप्त होते. मनुष्याचा जेव्हा भगवंताच्या ठिकाणी भाव कायम होतो, तेव्हा शरीर इत्यादीकडे वृत्ती धावत नाही. तो तर केवळ भगवंतातच तल्लीन राहतो, ज्यामुळे शरीराचे तादात्म्य समाप्त होते. म्हणून त्याला विवेक विचार करावा लागत नाही आणि वर्णाश्रमाबद्दलचीही शंका उपस्थित होत नाही. याप्रमाणे विवेकानेही तादात्म्य समाप्त होते. तादात्म्य समाप्त झाल्यावर त्याचे ठिकाणी कोणत्याही वर्ण अथवा आश्रमाचा अभिमान नसतो. कारण स्व मध्ये वर्ण, आश्रम नसतो. तो वर्ण आश्रमातीत आहे.

**परिशिष्ट भाव**—ज्याच्यात दुसऱ्याचा आश्रय नाही अशा अनन्य आश्रयाला येथे 'व्यपाश्रय' अर्थात् विशेष आश्रय म्हटले गेले आहे.

पूर्वजन्माच्या पाप्यापेक्षा वर्तमानचा पापी विशेष दोषी असतो. म्हणून पूर्वी (९।३०-३१ मध्ये) वर्तमानातील (या जन्मातील) पाप्याचा विषय सांगून आता या श्लोकात पुर्वजन्माच्या पाप्याचा विषय सांगतात—'**येऽपि स्युः पापयोनयः**'

***संबंध***—*आता भक्तीच्या शिल्लक राहिलेल्या दोन अधिकाऱ्यांचे वर्णन पुढील श्लोकात करत आहेत.*

## किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा।
## अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्॥ ३३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पुण्याः** | = (जे) पवित्र आचरण करणारे | **ब्राह्मणाः** | = ब्राह्मण | **भक्ताः** | = भगवद्भक्त असतील (ते परमगतीला प्राप्त होतील) |
| | | **तथा** | = आणि | | |
| | | **राजर्षयः** | = ऋषिस्वरूपी क्षत्रिय | | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **किम् पुनः** | = हे काय सांगायला पाहिजे! | **अनित्यम्** | = अनित्य (आणि) | **प्राप्य** | = प्राप्त करून (तू) |
| **इमम्** | = (म्हणून) या | **असुखम्** | = सुखरहित | **माम्** | = माझे |
| | | **लोकम्** | = शरीराला | **भजस्व** | = भजन कर. |

*व्याख्या*— **किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता* राजर्षयस्तथा**—जर वर्तमानकाळी पाप करणारा संपूर्ण दुराचारी आणि पूर्व जन्मात पाप केल्यामुळे नीच योनीत जन्म घेणारे प्राणी तसेच स्त्रीया, वैश्य आणि शूद्र, हे सर्व मला शरण होऊन, माझा आश्रय घेऊन परमगतीला प्राप्त होतात, परम पवित्र होतात तर मग ज्यांचे पूर्व जन्मांचे आचरणही चांगले आहे आणि या जन्मामध्येही उत्तम कुलात जन्म झाला आहे असे पवित्र ब्राह्मण आणि पवित्र क्षत्रिय जर मला शरण आले, माझे भक्त झाले तर ते परमगतीला प्राप्त होतील हे काय सांगितले पाहिजे? अर्थात् ते निःसंशय परमगतीला प्राप्त होतील.

पूर्वी तीसाव्या श्लोकात ज्याला दुराचारी म्हटले आहे, त्याच्या विरुद्ध येथे **''पुण्याः''** पद आले आहे आणि बत्तीसाव्या श्लोकात ज्यांना **''पापयोनयः''** म्हटले आहे, त्यांच्या विरुद्ध येथे **''ब्राह्मणाः''** पद आले आहे. याचा आशय ब्राह्मण सदाचारीही आहे आणि पवित्र जन्माचाही आहे. त्याचप्रमाणे या जन्मात शुद्ध आचरण असणारे क्षत्रिय आहेत, त्यांच्या वर्तमानकाळाच्या पवित्रतेचे दिग्दर्शन करण्यासाठी येथे **''ऋषि''** शब्द आला आहे आणि ज्यांचे जन्मारंभक कर्मही शुद्ध आहेत हे स्पष्ट करण्यासाठी येथे **''राजन्''** शब्द आला आहे.

पवित्र ब्राह्मण आणि ऋषिस्वरूप क्षत्रिय—या दोघांच्या मध्यभागी **''भक्ताः''** पद देण्याचे तात्पर्य ज्यांचे पूर्वजन्माचे आचरणही शुद्ध आहे आणि जे या जन्मातही सर्वथा पवित्र आहेत ते (ब्राह्मण आणि क्षत्रिय) जर भगवद्भक्ती करू लागतील, तर त्यांच्या उद्धाराविषयी शंका होऊच कशी शकते?

**'पुण्या ब्राह्मणाः' 'राजर्षयः' आणि 'भक्ताः'**—ह्या तीन गोष्टी म्हणण्याचे तात्पर्य, या जन्माच्या आचरणाने पवित्र आणि पूर्वजन्माच्या शुद्ध आचरणामुळे या जन्मात उच्च कुलात उत्पन्न होण्यामुळे पवित्र—या दोन्ही गोष्टी तर बाह्य आहेत. कारण संपूर्ण कर्म (मन, बुद्धी, शरीर, इंद्रियाकडून) बाह्य होत असतात तर त्यांच्यामुळे जी पवित्रता होईल तीही बाह्यच होईल. ह्या शुद्धीचे वाचकही येथे **''पुण्या ब्राह्मणाः''** आणि **''राजर्षयः''** ही दोन पदे आली आहेत. परंतु जे अंतःकरणातून स्वतः भगवंताला शरण होतात, त्यांच्यासाठी अर्थात् स्वतःसाठी येथे **''भक्ताः''** पद आले आहे.

**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्**—हा मनुष्यजन्म अनंत जन्मांचा अंत करणारा असल्यामुळे अंतिम जन्म आहे. या जन्मात मनुष्य भगवंताला शरण होऊन भगवंतालाही सुख देणारा होऊ शकतो. म्हणून हा मनुष्यजन्म पवित्र तर आहे परंतु अनित्य आहे. **''अनित्यम्''** अर्थात् नित्य राहणारा नव्हे. केव्हा समाप्त होईल याचा नेम नाही. म्हणून लवकरात लवकर आपला उद्धार करून घेतला पाहिजे.

या मनुष्यशरीरात सुखही नसते **''असुखम्''** आठव्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात भगवंतांनी मनुष्यजन्माला दुःखालय म्हटले आहे. म्हणून मनुष्यशरीर मिळाल्यावर सुखभोगाच्या लालचीत पडू नये. लालूच आणि सुख भोगण्यात आपला भाव आणि समय खर्च करता कामा नये.

येथे **''इमं लोकम्''** मनुष्यशरीराचा वाचक आहे, जे केवळ भगवत्प्राप्तीसाठीच मिळालेले आहे. मनुष्यशरीर मिळाल्यावर एखाद्या पूर्वकर्मामुळे भविष्यात या जीवाचा दुसरा जन्म होईल, असे कोणते विधान भगवंताने तयार केलेले नाही. तर केवळ आपल्या प्राप्तीसाठीच हा अंतिम जन्म दिला आहे. जर या जन्मात भगवत्प्राप्ती करून घेणे, आपला उद्धार करून घेणे, राहून गेले, तर इतर शरीरात हा अवसर मिळणार नाही. म्हणून भगवान् म्हणतात की, या मनुष्यशरीराला प्राप्त करून केवळ माझे भजन कर. मनुष्यात जी काही विलक्षणता येत असते ती सर्व भजन करण्यानेच येत असते.

**मां भजस्व**—या पदात भगवंताचे हे तात्पर्य नाही की, माझे भजन करण्याने मला काही लाभ होईल तर तुलाच महान लाभ होईल† म्हणून तू तत्परतेने केवळ मलाच सम्मुख हो, केवळ माझाच उद्देश ठेव, माझ्याकडेच लक्ष ठेव, सांसारिक पदार्थांचे येणे-जाणे तर माझ्या विधानानुसार आपोआप होत राहील, परंतु तू तुझ्याकडून उत्पत्ति-विनाशशील पदार्थांचे ध्येय, लक्ष्य ठेवू नको, तिकडे दृष्टीच जाऊ देऊ नको, त्यांना महत्त्वच देऊ नको. त्यांच्याशी विमुख होऊन मला सम्मुख हो.

## मार्मिक गोष्ट

ज्याप्रमाणे आईची दृष्टी मुलाच्या शरीरावर राहत असते

* येथे ''भक्ताः'' पद देहली-दीपक—(उंबरठ्यावर ठेवलेला दिवा) न्यायाने ब्राह्मण आणि राजर्षी (क्षत्रिय) या दोन्हीसाठी आले आहे.

† याच भावाला अनुसरून भगवंतांनी येथे आत्मनेपदी ''भजस्व'' क्रिया दिली आहे.

त्याचप्रमाणे भगवंत आणि त्यांच्या भक्तांची दृष्टी प्राण्यांच्या स्वरूपावर राहत असते. ते स्वरूप भगवंताचा अंश असल्याने शुद्ध असते, चेतन असते, अविनाशी असते. परंतु प्रकृतीशी संबंध जोडून ते नाना प्रकारच्या आचरणाचे होत असते. एकोणतीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मी संपूर्ण प्राण्यात सम आहे. कोणत्याही प्राण्याशी माझा राग आणि द्वेष नसतो. माझ्या सिद्धांताच्या, माझ्या मान्यतेच्या, आणि माझ्या नियमांच्या संपूर्णपणे विरुद्ध चालणारे जे दुराचाराती दुराचारी आहेत, तेही जेव्हा माझ्या ठिकाणी आत्मीयता ठेवून माझे भजन करतात तेव्हा त्यांच्या वास्तविक स्वरूपाकडे दृष्टी ठेवणारा मी त्यांना पापी कसे समजू शकतो? समजू शकत नाही आणि त्यांच्या पवित्र होण्यात उशीर कशाला लागू शकतो? लागू शकत नाही. कारण माझा अंश असल्याने ते संपूर्णपणे पवित्र आहेतच. केवळ उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या आंगतुक दोषाच्या अनुषंगाने ते स्वत: दोषी कसे होऊ शकतात? आणि मी त्यांना दोषी कसे मानू शकतो? ते तर केवळ उत्पत्ति-विनाशशील शरीराशी "मी" आणि "माझे" पणा केल्यामुळे मायेला परवश होऊन दुराचारास, पापाचारास प्रवृत्त झाले होते. परंतु वास्तविक पाहिले तर ते माझेच अंश आहेत. त्याचप्रमाणे जे पापयोनीवाले आहेत अर्थात् मागील पापामुळे ज्यांचा चांडाळ आणि नीच योनीत आणि पशू, पक्षी इत्यादी तिर्यक योनीत जन्म झाला आहे. ते तर आपल्या, पूर्व पापापासून मुक्त होत आहेत. म्हणून असे पापयोनीवाले प्राणीही मला शरण होऊन माझा जर धावा करतील, तर त्यांचा उद्धार होतो. अशा प्रकारे भगवंतांनी वर्तमानातील पापी आणि पूर्व जन्माचे पापी या दोन्ही खालच्या दर्जाच्या माणसांचे वर्णन केले.

आता पुढे भगवंतांनी मध्यम दर्जाच्या मनुष्याचे वर्णन केले आहे. प्रथम "**स्त्रियः**" पदाने सर्व स्त्री जातीला घेतले. यात ब्राह्मण आणि क्षत्रियांच्या स्त्रीयाही आल्या ज्या वैश्यांसाठी वंदनीय आहेत. म्हणून त्यांना प्रथम सांगितले. जे ब्राह्मण आणि क्षत्रियांच्या सारखे पुण्यात्मा नाहीत परंतु द्विजाती आहेत, ते वैश्य आहेत. जे द्विजाती नाहीत अर्थात् जे वैश्यासमान पवित्र नाहीत, ते "शूद्र" आहेत. त्या स्त्रीया, वैश्य आणि शूद्रही माझा आश्रय घेऊन परमगतीला प्राप्त होतात. जी उत्तम दर्जाची माणसे आहेत अर्थात् जी पूर्वजन्मात चांगले आचरण असल्याने आणि या जन्मात उत्तम कुळात जन्माला आल्याने पवित्र आहेत, असे ब्राह्मण आणि क्षत्रियही माझा आश्रय घेऊन परमगतीला प्राप्त होतील यात संशयच काय असणार?

भगवंतांनी येथे (९।३०-३३ मध्ये) भक्तीच्या सात अधिकाऱ्यांची नावे घेतली आहेत—दुराचारी, पापयोनी, स्त्रीया, वैश्य, शूद्र, ब्राह्मण आणि क्षत्रिय. या सातापैकी सर्वात प्रथम भगवंतांनी श्रेष्ठ अधिकाऱ्याचे अर्थात् पवित्र भक्त ब्राह्मणाचे अथवा क्षत्रियाचे नाव घ्यावयास पाहिजे होते, परंतु भगवंतांनी सर्वात प्रथम दुराचाऱ्याचे नाव घेतले आहे. याचे कारण भक्तीत जो जितका लहान आणि अभिमानरहित असतो तो भगवंताला तितकाच अधिक आवडतो. दुराचाऱ्यामध्ये सदगुण-सदाचारांचा अभिमान नसतो, म्हणून त्याचे ठिकाणी स्वाभाविकच लहानपणा आणि दीनता असते. म्हणून भगवंतांनी सर्वात प्रथम दुराचाऱ्याचे नाव घेतले आहे. याच कारणाने, बाराव्या अध्यायात भगवंतांनी सिद्ध भक्तांना आवडते आणि साधक भक्तांना अत्यंत आवडते म्हटले आहे (१२।१३-२०)

आता या विषयात लक्ष देण्याची एक गोष्ट अशी आहे की, भगवंतांनी येथे भक्तीचे जे सात अधिकारी सांगितले आहेत त्यांचा विभाग वर्ण (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र) आचरण (दुराचारी आणि पापयोनी) आणि व्यक्तित्व (स्त्रीया) यानुसार केला गेला आहे. यावरुन सिद्ध होत आहे की, वर्ण (जन्म) आचरण आणि व्यक्तित्व यांनी भगवद्भक्तीत काही फरक पडत नाही. कारण या तिन्हीचा संबंध शरीराशी आहे. परंतु भगवंताचा संबंध स्वरूपाशी आहे शरीराशी नव्हे. स्वरूपाने तर सर्वच भगवंताचेच अंश आहेत. जर त्यांनी भगवंताशी संबंध जोडून त्यांच्या सम्मुख होऊन भगवंताचे भजन केले, तर त्यांच्या उद्धारात काहीही फरक पडणार नाही. कारण भगवंताचे अंश असल्याने ते पवित्र आणि उद्धार स्वरूपच आहेत. तात्पर्य, भक्तीच्या सात अधिकाऱ्यात जी काही विलक्षणता, विशेषता आली आहे, ती एखाद्या वर्ण, आश्रम, भाव, आचरण इत्यादींना अनुसरून आलेली नसते तर भगवंताच्या संबंधाने, भगवद्भक्तीने आलेली असते.

सातव्या अध्यायात सोळाव्या श्लोकात तर भगवंतांनी भावानुसार भक्तांचे चार भेद सांगितले आणि येथे वर्ण, आचरण आणि व्यक्तित्वानुसार भक्तीच्या अधिकाऱ्यांचे सात भेद सांगितले. याचे तात्पर्य, भावाप्रमाणे तर भक्तात भिन्नता आहे परंतु वर्ण, आचरण इत्यादीला अनुसरून काहीही फरक नसतो अर्थात् भक्तीचे सर्व अधिकारी आहेत. मात्र एखादा भगवंताची इच्छा करीत नाही आणि भगवंतास मानीत नाही—ही गोष्ट दुसरी आहे, परंतु भगवंताकडून कोणीही भक्तीचा अनधिकारी नाही.

सर्व माणसे भगवंताशी संबंध जोडू शकतात, कारण ही माणसे भगवंतापासून स्वत: विमुख झालेली आहेत. भगवंत

कधीही कोण्याही मनुष्यापासून विमुख झालेले नाहीत. म्हणून भगवंतापासून विमुख झालेली सर्व माणसे भगवंताला सम्मुख होण्यात, भगवंताशी संबंध जोडण्यात, भगवद्भक्ती करण्यात स्वतंत्र आहेत, समर्थ आहेत, योग्य आहेत, अधिकारी आहेत. म्हणून भगवंताकडे वाटचाल करण्यात कोणीही कधीही किंचित्मात्रही निराश होता कामा नये.

**परिशिष्ट भाव**—तीसाव्या श्लोकापासून तेहतीसाव्या श्लोकापर्यंत भगवंताने भक्तीच्या आणि भगवत्प्राप्तीच्या सात अधिकाऱ्यांची नावे घेतली आहेत—दुराचारी, पापयोनी, स्त्रीया, वैश्य, शूद्र, ब्राह्मण आणि क्षत्रिय. या सातांच्या बाहेर कोणीही प्राणी नाही. कसाही जन्म असो, कोणतीही जात असो आणि पूर्वजन्माचे कितीही पाप असो, परंतु भगवान् आणि त्यांच्या भक्तीचे सर्व मानव अधिकारी आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र—या चारी वर्णांची नावे उपरिनिर्दिष्ट श्लोकात आली आहेत. चारी वर्णांत केवळ पुरुषच पुरुष कोणी समजू नये. म्हणून स्त्रीयांचे नाव वेगळे आले आहे. जे चारी वर्णांपेक्षा निकृष्ट आहेत, ते यवन, हूण, खस इत्यादी सर्व पाप योनीत आले. मनुष्याशिवाय दुसरे जीवही (पशू, पक्षी इत्यादीही) पाप योनीत घेतले जाऊ शकतात. कारण सर्व जीव भगवंताचेच अंश असल्याने भगवंताकडे आकृष्ट होण्यात (भगवंताकडून) कोणालाही मनाइ नाही.

जो वर्तमानात पाप करीत आहे तो 'दुराचारी' आहे आणि पूर्वजन्मांच्या पापामुळे ज्याचा नीच योनीत जन्म झाला आहे तो 'पापयोनी' आहे. तात्पर्य, दुराचाराती दुराचारीही आणि नीचाती नीच योनीतीलही भगवत्प्राप्तीचा अधिकारी आहे. म्हणून जाती आणि आचरणाच्या अनुषंगाने मनुष्याने भगवत्प्राप्तीविषयी निराश होऊ नये. जाती आणि आचरण अनित्य आणि बनावटी आहे. परंतु भगवंताशी मनुष्याचा संबंध नित्य आणि वास्तविक आहे. म्हणून भगवान् केवळ भक्तीनेच नाते (संबंध) मानतात, जाती-आचरणाचे नव्हे—

**कह रघुपति सुनु भामिनी बाता। मानऊँ एक भगति कर नाता॥**
**जाति पाँति कुलधर्म बड़ाइ। धन बल परिजन गुन चतुराई॥**
**भगति हीन नर सोहइ कैसा। बिनु जल बारिद देखिअ जैसा॥**

(मानस, अरण्य० ३५। २-३)

संसारातील लोक बाह्य जाती-आचरण पाहतात, अंत:करणातील तत्त्व (वास्तविक) पाहत नाहीत. परंतु भगवान् तत्त्वदृष्टीने पाहतात की, हा तर माझाच कायमचा अंश आहे.

सातव्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात भगवंताने अंत:करणातील भावाच्या अनुषंगाने भक्तांचे अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी—असे चार भेद सांगितले आहेत आणि येथे बाह्य मान्यतेनुसार (जाती आणि आचरणानुसार) लौकिक दृष्टीने भक्तांचे सात प्रकार सांगितले आहेत. सातव्या अध्यायात अशा भक्तांची गोष्ट आहे, जे भगवंतात लागलेले आहेत आणि येथे अशा माणसांविषयी म्हटले आहे जे भगवंतात लागू शकतात. तात्पर्य हे आहे की, वर्ण, आश्रम, वेशभूषा, जाती, संप्रदाय इत्यादी वेग-वेगळे असूनही सर्वच मनुष्य अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी-असे चार प्रकारचे भक्त होऊ शकतात आणि भगवंताला प्राप्त करू शकतात. भगवत्प्राप्तीच्या विषयात सर्व एक आहेत, कोणी मोठा-लहान नाही. भगवत्प्राप्तीचा अनधिकारी कोणत्याही योनीत कोणी नाहीच, झाला नाही, होणार नाही, होऊ शकत नाही.

**'किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा'**—या श्लोकार्धाच्या मध्यात **'भक्ताः'** पद देण्याचे तात्पर्य हे आहे की, पवित्र आचरण करणाऱ्या ब्राह्मणांचा आणि ऋषिस्वरूप क्षत्रियांचा महिमा नाही, तर त्यांच्यात जी भक्ती आहे त्या भक्तीचा महिमा आहे. तात्पर्य हे झाले की, भगवंताचा दुराचारी आणि पापयोनी यांच्याशीही द्वेष नाही आणि पुण्यात्मा ब्राह्मण व क्षत्रिय यांच्याशीही पक्षपात नाही. ते सर्व प्राण्यात समान आहेत (गीता ९। २९) परंतु जो प्रेमपूर्वक भगवंताचे भजन करतो तो कोणत्याही देश, वेश, वर्ण, आश्रम, जाती, संप्रदाय इत्यादीचा का असेना, त्याचा भगवंताशी घनिष्ठ संबंध आहे—**'मयि ते तेषु चाप्यहम्'**। (गीता ९। २९). म्हणून दुराचारी, पापयोनी, स्त्रीया, वैश्य, शूद्र, ब्राह्मण आणि क्षत्रिय—हे सातही भक्तीत एक होतात, यांच्यात काही फरक राहत नाही. म्हणून भगवान् भजन करण्याची आज्ञा देतात—**'भजस्व माम्'** भजन करण्याचा अर्थ आहे—भगवन्सन्मुख होणे, भगवंतात प्रियता (आत्मीयता) होणे, भगवत्प्राप्तीचा उद्देश होणे. भगवद्बुद्धीने दुसऱ्यांची सेवा करणे, दुसऱ्यांना देण्याचा भाव ठेवणे, अभावग्रस्तांची साहाय्यता करणे—हेही भजन आहे.

**'अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्'**—अनित्य आणि सुखरहित अशा शरीराला प्राप्त करून आपण जिवंत रहावे व सुख भोगत रहावे—अशा कामनेचा त्याग करून भगवंताचे भजन करावे. कारण संसारात सुख नाहीच, केवळ सुखाचा भ्रम आहे. तसेच जिवंत राहण्याचाही भ्रम आहे. आपण जीवन जगत नाही तर प्रत्येक क्षणाला मरत आहोत.

पूर्वी एकोणतीसाव्या श्लोकात भगवंताने म्हटले होते की, जे प्रेमपूर्वक माझे भजन करतात ते माझ्यात आणि मी त्यांच्यात आहे. म्हणून भगवान् भजन करण्याची आज्ञा देत आहेत—'भजस्व माम्'.

***संबंध***—*एकोणतीसाव्यापासून तेहतीसाव्या श्लेकापर्यंत भगवंताच्या भजनाचाच विषय मुख्य आलेला आहे. आता पुढील श्लोकात त्या भजनाचे स्वरूप सांगतात.*

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः॥ ३४॥**

**मद्भक्तः** = (तू) माझा भक्त
**भव** = हो,
**मन्मनाः** = माझ्यात मन लावणारा हो,
**मद्याजी** = माझे पूजन करणारा हो
**माम्** = (आणि) मला
**नमस्कुरु** = नमस्कार कर
**एवम्** = अशाप्रकारे
**आत्मानम्** = आपल्या-स्वतःला
**युक्त्वा** = (माझ्यात) लावून
**मत्परायणः** = माझ्या परायण झालेला (तू)
**माम्, एव** = मलाच
**एष्यसि** = प्राप्त होशील.

***व्याख्या***— [आपल्या अंतःकरणातील गोष्ट तिथेच प्रगट केली जाते जिथे ऐकणारात सांगणाऱ्याविषयी दोषदृष्टी नसेल आणि आदरभाव असेल. अर्जुन दोषदृष्टिरहित आहेत म्हणून भगवंतांनी त्यांना "**अनसूयवे**" (९।१) म्हटले आहे. याच कारणाने भगवान् येथे अर्जुनाला आपल्या अंतःकरणातील गुप्त गोष्ट सांगत आहेत.]

**मद्भक्तः**—"माझा भक्त हो" म्हणण्याचे तात्पर्य तू केवळ माझ्याशीच आत्मीयता ठेव, केवळ माझ्याशीच संबंध जोड, जो अनादिकालापासून स्वतःसिद्ध आहे. केवळ अज्ञानानेच शरीर आणि संसाराशी आपला संबंध मानला आहे अर्थात् "मी अमुक वर्णाचा आहे, अमुक आश्रमाचा आहे, अमुक संप्रदायाचा आहे, अमुक नावाचा आहे"—अशा प्रकारे वर्ण, आश्रम, इत्यादींना आपल्या अहंतेमध्ये ठेवले आहे. अशा प्रकारे असत्‌रूपाने बनलेल्या ह्या अवास्तविक अहंतेला आता वास्तविक सत्‌रूपात बदलून घे की, "मी तुमचा आहे आणि तुम्ही माझे आहात" मग तुझी माझ्याशी स्वाभाविकच आत्मीयता होईल, जी वास्तविक आहे.

**मन्मना भव**—मन त्याच ठिकाणी लागते जेथे आत्मीयता असते, प्रियता असते. तुझा माझ्याशी जो अखंड संबंध आहे त्याला मी तर विसरू शकत नाही परंतु तू विसरू शकतोस म्हणून तुला "माझ्या ठिकाणी मन ठेवणारा हो" असे म्हणावे लागत आहे.

**मद्याजी**—"माझे पूजन करणारा हो" अर्थात् तू खाणे-पिणे, झोपणे-जागणे, येणे-जाणे, काम-धंदा करणे इत्यादी ज्या काही क्रिया करतोस त्या सर्वच्या सर्व माझ्या पूजेच्या रूपातच कर, त्या सर्वांना माझी पूजाच समज.

**मां नमस्कुरु**—"मला नमस्कार कर" म्हणण्याचे तात्पर्य, माझे जे काही अनुकूल, प्रतिकूल अथवा सामान्य विधान आहे, त्यात तू परम प्रसन्न रहा. मग मी कदाचित तुझ्या मन आणि मान्यतेच्या संपूर्णपणे विरुद्ध निर्णय देईल, तरीही त्यामध्ये तू प्रसन्न रहा. जे मनुष्य हानी आणि परलोकाच्या भयाने माझ्या चरणावर नमस्कार करतात, मला शरण येतात, ते वास्तविक आपल्या सुख आणि सुविधेलाच शरण होतात, मला शरण नव्हे. मला शरण झाल्यावरही एखाद्याकडून काही तरी सुख-सुविधा, मिळविण्याची इच्छा असते तर तो संपूर्ण मला शरणागत कुठे झाला? कारण तो जोपर्यंत काही ना काही सुख-सुविधा इच्छितो, तोपर्यंत तो आपले काही स्वतंत्र अस्तित्व मानत असतो.

वास्तविक मला नमस्कार करणारा तोच समजला जातो, जो आपले स्वतंत्र अस्तित्व न ठेवता माझ्या मर्जीत आपले मन मिसळून टाकतो. एवढेच नव्हे तर, संपूर्ण संसारापासूनही आपली सुख-सुविधा, मान-प्रतिष्ठेची किंचितही अपेक्षा ठेवत नाही. अनुकूलता-प्रतिकूलतेचे ज्ञान झाले तरी त्याच्यावर त्याचा काहीही परिणाम होत नाही. अर्थात् माझ्याकडून एखादी अनुकूल-प्रतिकूल घटना घडली तरी मत्परायण असलेल्या भक्ताला त्या घटनेविषयी विषमता राहत नाही. अनुकूलता-प्रतिकूलता याचे ज्ञान झाल्यावरही, ती घटना त्याला दोन रूपात दिसत नाही, तर केवळ माझ्या कृपारूपानेच दिसत असते.

माझेकडून केले गेलेले विधान मग ते शरीराला अनुकूल असो अथवा प्रतिकूल असो, माझ्या विधानाकडून कशीही घटना घडो, त्याने माझ्याकडून मिळालेला प्रसाद समजून परम प्रसन्न रहावयास हवे. जर मनाच्या अत्यंत प्रतिकूल घटना घडली असेल तर त्यात माझी विशेष कृपा मानली पाहिजे कारण त्या घटनेत त्याची सम्मती नसते. अनुकूल घटनेत जितक्या अंशात सम्मती होत असते तितक्या अंशात ती

घटना त्याच्यासाठी अपवित्र होते. परंतु प्रतिकूल घटनेत केवळ माझेच केलेले शुद्ध विधान असते—या गोष्टीला ओळखून त्याने परम प्रसन्न राहिले पाहिजे.

मनुष्य प्रतिकूल घटनेची इच्छा करत नाही, तीत त्याचे अनुमोदनही नसते तरीही अशी घटना घडते. तर ती घटना उपस्थित होण्यास कोणतेही निमित्त का असेना आणि तेही जरी एखाद्याला निमित्त मानून घेतले तरी परंतु वास्तविक त्या घटनेला घडविण्यात माझाच हात आहे. माझीच मर्जी असते*. म्हणून मनुष्याने त्या घटनेत दु:खी होणे आणि चिंता करणे तर दूरच राहिले तर त्यात अत्यंत प्रसन्न राहिले पाहिजे. त्याची ही प्रसन्नता माझ्या विधानाला धरून नसावी तर मला (विधान करणाऱ्याला) धरून असली पाहिजे. कारण जर त्यात त्या मनुष्याचे कल्याण होत नसेल तर सर्व प्राण्यांचा परम सुहृद् मी त्याच्यासाठी अशी घटना का घडवील? अशा प्रकारे हे अर्जुन! तूही संपूर्णपणे मला शरण हो अर्थात् माझ्या प्रत्येक विधानात परम प्रसन्न रहा.

ज्याप्रमाणे एखादा एखाद्याचा काही अपराध करतो तेव्हा तो त्याच्यासमोर दंडवत घालतो आणि म्हणतो की, आपण मला दंड द्या अथवा पुरस्कार द्या अथवा तिरस्कार करा, वाटेल ते करा, त्यातच माझी परम प्रसन्नता आहे. त्याच्या मनात असे नसते की, समोरचा माणूस माझ्या अनुकूलच निर्णय देईल. तसेच भक्त भगवंताना संपूर्णपणे शरण होऊन म्हणतो की, ''हे प्रभू! मी न जाणो कोण्या जन्मात प्रतिकूल कोण कोणते आचरण केले असेल, त्याचा मला पत्ता नाही. परंतु त्या कर्मानुरूप आपण जी परिस्थिती पाठवाल ती मला संपूर्णपणे कल्याणकारकच होईल. म्हणून माझा कोणत्याही परिस्थितीत थोडाही असंतोष न होता प्रसन्नता राहील.''

''हे नाथ! माझ्या कर्माकडे आपण किती लक्ष ठेवता की, मी न जाणो कोण्या कोण्या जन्मात कोण-कोणत्या परिस्थितीला परवश होऊन कोण कोणती कर्म केली आहेत, त्या संपूर्ण कर्मापासून रहित करण्यासाठी आपण किती विचित्र विधान कायम करता आहात. मी तर आपल्या विधानाला थोडेही समजू शकत नाही आणि माझ्यात आपल्या विधानाला समजून घेण्याची शक्तीही नाही. म्हणून हे नाथ! मी त्यात आपली बुद्धी कशाला लावू? मला तर केवळ आपल्याकडेच लक्ष द्यावयाचे आहे, कारण आपण जे काही विधान करता त्यात आपलाच हात असतो, अर्थात् ते आपणच केलेले असते, जे माझ्यासाठी परम हितकारकच असते हेच ''मां नमस्कुरु'' चे तात्पर्य आहे.

**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायण:**—येथे ''**एवम्**'' चे तात्पर्य आहे की, ''**मद्भक्त:**'' ह्या पदाने, तू स्वत: मला अर्पित झालास, ''**मन्मना:**'' या पदाने तुझे अंत:करण मत्परायण झाले, ''**मद्याजी**'' या पदाने तुझ्या सर्व क्रिया आणि पदार्थ माझी पूजा सामुग्री बनले आणि ''**मां नमस्कुरु**'' ने तुझे शरीर माझ्या चरणाला अर्पित झाले अशा प्रकारे माझा परायण झालेला तू मलाच प्राप्त होशील.

**युक्त्वैवमात्मानम्**—(स्वत: आपण आपल्याला माझ्यात व्यस्त करून) म्हणण्याचे तात्पर्य ''मी भगवंताचाच आहे'' अशा आपल्या अहंतेचे परिवर्तन झाल्यावर शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ, क्रिया हे सर्वचे सर्व माझ्यातच व्यस्त होतील. याचेच नाव शरणागती आहे. अशी शरणगती झाल्यावर माझीच प्राप्ती होईल, यात संशय मुळीच नाही. माझ्या प्राप्तीविषयी संशय तेव्हाच राहतो, जेव्हा माझ्याशिवाय इतरांची कामना असते, आदर असतो, महत्त्वबुद्धी असते. कारण कामना, आसक्ती महत्त्वबुद्धी इत्यादी असल्यावर सर्व ठिकाणी परिपूर्ण राहत असूनही माझी प्राप्ती होत नाही.

**मत्परायण:**—याचे तात्पर्य माझ्या मर्जीशिवाय काही-ही करणे-करविणेची थोडीही स्फुरणा न रहावी. माझ्याशी संपूर्णपणे अभिन्न होऊन माझ्या हातचे खेळणे व्हावे.

## विशेष गोष्ट

(१) भगवंताचा भक्त बनल्याने, भगवंताशी आत्मीयता केल्याने, ''मी भगवंताचा आहे'' अशा प्रकारे अहंता बदलून दिल्याने मनुष्यात फार लवकर परिर्वतन होत असते. ते परिवर्तन असे होईल की, तो भगवंतात मन लावणारा होईल भगवंताची पूजा करणारा होईल आणि भगवंताच्या संपूर्ण विधानात प्रसन्न राहील. अशा प्रकारे या चारी गोष्टींनी शरणागती पूर्ण होत असते. परंतु या चारीत मुख्यता भगवंताचा भक्त होण्याचीच आहे; कारण जो स्वत: भगवंताचा होतो त्याचे मन, बुद्धी आपले राहत नाही, पदार्थ आणि क्रिया आपल्या राहत नाहीत आणि शरीर आपले राहत नाही. तात्पर्य लौकिक दृष्टीत ज्या वस्तू आपल्या म्हणविल्या जातात ज्या उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या आहेत, त्यापैकी कोणतीही वस्तू आपली नसते. स्वत: अर्पित झाल्याने संपूर्ण प्राकृत वस्तू भगवंताच्याच होतात. त्यातून

* राम कीन्ह चाहहिं सोइ होई। करै अन्यथा अस नहिं कोई॥ (मानस १।१२८।१)

आपली ममता निघून जात असते. त्याविषयी ममता करणे हीच चूक होती, ती चूक संपूर्णपणे समाप्त होते.

(२) माणसांनी संसाराशी कितीही एकता मानली, तरीही ते संसाराला जाणून घेऊ शकत नाहीत. त्याचप्रमाणे शरीराशी कितीही अभिन्नता समजली तरीही, शरीराशी एक होऊ शकत नाहीत, त्याला जाणूनही घेऊ शकत नाहीत. वास्तविक शरीर-संसाराशी वेगळे होऊनच जाणून घेणे शक्य आहे. या रीतीने परमात्म्याहून वेगळे राहून परमात्म्याला यथार्थरूपाने जाणून घेता येणे शक्य नाही. परमात्म्याला तर तेच जाणून घेऊ शकतात जे परमात्म्याशी एक झाले आहेत अर्थात् ज्यांनी ''मी'' आणि ''माझे'' पणा संपूर्णपणे भगवंताला समर्पण केला आहे. ''मी'' आणि ''माझे'' तर दूर राहिले ''मी'' ''आणि'' माझेपणाचा गंधही राहता कामा नये की, मी ही कुणीतरी आहे, माझाही एखादा सिद्धांत आहे, माझेही काही वैशिष्ट्य आहे इत्यादी.

ज्याप्रमाणे प्राणी आपल्या शरीराशी एकता मानतो तर स्वाभाविकच त्याला शरीराचे सुख-दु:ख आपले सुख-दु:ख वाटते. मग त्याला शरीरापासून वेगळ्या आपल्या अस्तित्वाचे भान राहत नाही. त्याचप्रमाणे भगवंताशी आपल्या स्वत: सिद्ध एकतेचा अनुभव आल्यावर भक्ताचे आपले किंचितमात्रही वेगळे अस्तित्व राहत नाही. जसे संसारात भगवंताच्या मर्जीप्रमाणे जे काही परिवर्तन होत असते, त्याचा भक्तावर काहीही परिणाम होत नाही. तसेच त्याच्या स्थूल सूक्ष्म आणि कारण शरीरात जे काही परिवर्तन होत असते, त्याचा त्याच्यावर काहीही परिणाम होत नाही त्याच्या शरीराकडून भगवंताच्या मर्जीप्रमाणे स्वत: स्वाभाविक क्रिया होत राहतात. हीच वास्तविक भगवंताची परायणता आहे.

भगवंताला प्राप्त होण्याचे तात्पर्य, भगवंताशी अभिन्नता होते जी वास्तविकता आहे. ही अभिन्नता भेदभावानेही होत असते आणि अभेदभावानेही होत असते. जसे श्रीजीची भगवान् श्रीकृष्णाबरोबर अभिन्नता आहे. मूळात भगवान् श्रीकृष्णच श्रीजी (राधिका) आणि श्रीकृष्ण या दोन रूपात प्रगट झाले आहेत. दोन रूप असतानाही भगवंतापासून भिन्न नाहीत आणि भगवान् श्रीजीपासून भिन्न नाहीत. परंतु रसाचे (प्रेम) आदान-प्रदान करण्यासाठी त्यांच्यात योग आणि वियोगाची लीला होत असते. वास्तविक त्यांच्या योगातही वियोग आहे आणि वियोगातही योग आहे. अर्थात् योगाने वियोग आणि वियोगाने योग पुष्ट होत असतो. ज्यात अनिर्वचनीय प्रेमाची वृद्धी होत राहते. या अनिर्वचनीय आणि प्रतिक्षण वर्धमान प्रेमाला प्राप्त होणे हेच भगवंताला प्राप्त होणे आहे.

## सातव्या आणि नवव्या अध्यायाच्या विषयांची एकरूपता—

सातव्या अध्यायात आरंभी भगवंतांनी विज्ञानासहित ज्ञान अर्थात् राजविद्येला पूर्ण सांगण्याची प्रतिज्ञा केली होती **''ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषत:''** (७।२) सातव्या अध्यायात भगवंताच्या सांगण्याचा जो प्रवाह चालू होता, आठव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाच्या प्रश्न करण्याने त्यात काही परिवर्तन झाले. म्हणून आठव्या अध्यायाचा विषय समाप्त होताच भगवंत अर्जुनाने न विचारताच **''इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे। ज्ञानं विज्ञानसहितं''**..... (९।१) म्हणून आपल्याकडून पुन्हा विज्ञानासहित ज्ञान सांगणे सुरू करतात. सातव्या अध्यायात भगवंतांनी जो विषय तीस श्लोकांत सांगितला होता त्याच विषयाला नवव्या अध्यायात आरंभापासून दहाव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोका-पर्यंत अखंडितपणे सांगतच जातात. या श्लोकांत सांगितलेल्या गोष्टींचा अर्जुनावर फार मोठा प्रभाव पडतो, त्यामुळे ते दहाव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकापासून अठराव्या श्लोकापर्यंत भगवंताची स्तुती आणि प्रार्थना करतात. तात्पर्य सातव्या अध्यायात सांगितलेल्या गोष्टीला भगवंतांनी नवव्या अध्यायात संक्षेपाने, विस्ताराने अथवा प्रकारान्तराने सांगितले आहे.

सातव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात **''मय्यासक्तमना:''** इत्यादी पदांनी जो विषय संक्षेपाने सांगितला होता त्यालाच नवव्या अध्यायात चौतीसाव्या श्लोकात **''मन्मना:''** इत्यादी पदांनी थोड्या विस्ताराने सांगितले आहे.

सातव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मी विज्ञानासह ज्ञान सांगेन, जे जाणल्याने पुन्हा जाणण्याचे काहीही शिल्लक राहत नाही. हीच गोष्ट नवव्या अध्यायात भगवंतांनी अध्यायाच्या प्रथम श्लोकात म्हटली की, मी विज्ञानासहित ज्ञान सांगेन, ज्याला जाणून तू अशुभापासून (संसार) मुक्त होशील. मुक्ती झाल्यानंतर पुन्हा जाणणे बाकी राहत नाही. अशा प्रकारे भगवंतांनी सातव्या आणि नवव्या दोन्ही अध्यायाच्या आरंभी विज्ञानासहित ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा केली आणि दोघांचे एक फल सांगितले.

सातव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, हजारांपैकी कोणी एखादा मनुष्य वास्तविक सिद्धीसाठी प्रयत्न करतो आणि त्या प्रयत्न करणाऱ्यांपैकी कोणी एखादा माझ्या तत्त्वाला जाणून घेतो. याचे कारण नवव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात सांगतात की, या विज्ञाना-सहित ज्ञानावर श्रद्धा न करणारे मला प्राप्त न होता मृत्यूच्या मार्गाने जातात; अर्थात् वारंवार जन्मत-मरत राहतात.

सातव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात भगवंतांनी आपल्याला संपूर्ण जगताचा प्रभव आणि प्रलय सांगितले. हीच गोष्ट नवव्या अध्यायात अठराव्या श्लोकात **''प्रभवः प्रलयः''** पदांनी सांगितली.

सातव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकात भगवंतांनी आपल्याला सनातन बीज म्हटले आणि नवव्या अध्यायात अठराव्या श्लोकात आपल्याला अव्यय बीज म्हटले आहे.

सातव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात **''न त्वहं तेषु ते मयि''** म्हणून ज्या राजविद्येचे संक्षेपाने वर्णन केले होते त्याचेच नवव्या अध्यायात चौथ्या आणि पाचव्या श्लोकांत विस्ताराने वर्णन केले आहे.

सातव्या अध्यायाच्या तेराव्या श्लोकात भगवंतांनी संपूर्ण प्राण्यांना तिन्ही गुणांनी मोहित सांगितले आणि नवव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात संपूर्ण प्राण्यांना प्रकृतीला परवश झालेले म्हटले आहे.

सातव्या अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, जी माणसे मलाच शरण होतात ती मायेला तरून जातात आणि नवव्या अध्यायाच्या बावीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, जे अनन्य भक्त माझे चिंतन करत माझी उपासना करतात त्यांचा योगक्षेम मी वहन करतो.

सातव्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात भगवंतांनी **''न मां दुष्कृतिनो मूढाः''** म्हटले होते, त्यालाच नवव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकात **''अवजानन्ति मां मूढाः''** म्हटले आहे.

सातव्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात भगवंतांनी **''आसुरं भावमाश्रिताः''** पदाने जी गोष्ट सांगितली होती, तीच गोष्ट नवव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात **''राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः''** पदांनी म्हटली आहे.

सातव्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात ज्यांना **''सुकृतिनः''** म्हटले होते, त्यांनाच नवव्या अध्यायात तेराव्या श्लोकात **''महात्मानः''** म्हटले आहे.

सातव्या अध्यायाच्या सोळाव्यापासून अठराव्या श्लोकांपर्यंत सकाम आणि निष्कामभावाला अनुसरून भक्तांचे चार प्रकार सांगितले आणि नवव्या अध्यायाच्या तीसाव्या-पासून तेहतीसाव्या श्लोकापर्यंत वर्ण, आचरण आणि व्यक्तित्वाला धरून भक्तांचे सात भेद सांगितले.

सातव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात भगवंतांनी महात्म्याच्या दृष्टीने **''वासुदेवः सर्वम्''** म्हटले आणि नवव्या अध्यायात एकोणीसाव्या श्लेकात भगवंतांनी आपल्या दृष्टीने **''सदसच्चाहम्''** म्हटले.

भगवंताला विमुख होऊन इतर देवताकडे वळण्याची दोन मुख्य कारणे आहेत. पहिली कामना आणि दुसरे भगवंताला न ओळखणे. सातव्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकात कामनेमुळे देवतांना शरण जाण्याविषयी सांगितले. आणि नवव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात भगवंताना न ओळखण्यामुळे देवतांचे पूजन करण्याची गोष्ट सांगितली.

सातव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात सकाम पुरुषांना अंत होणारे (नाशवान) फल मिळण्याची गोष्ट सांगितली आणि नवव्या अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात सकाम पुरुषांच्या आवागमनाला प्राप्त होण्याविषयी सांगितले.

सातव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, देवतांचे भक्त देवतांना आणि माझे भक्त मला प्राप्त होतात. हीच गोष्ट भगवंतांनी नवव्या अध्यायाच्या पंचवीसाव्या श्लोकात सांगितली.

सातव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धात भगवंतांनी जे **''अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः''** म्हटले होते, त्यालाच नवव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकाच्या पूर्वार्धात **''अवजानन्ति मां मूढाः मानुषीं तनुमाश्रितम्''** म्हटले आहे. तसेच सातव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धात जे **''परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्''** म्हटले होते, त्याला नवव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकाच्या उत्तरार्धात **''परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्''** म्हटले आहे.

सातव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या श्लोकात भगवंतांनी ''सर्गे यान्ति'' म्हटले होते. त्यालाच नवव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात **''मृत्युसंसारवर्त्मनि''** म्हटले आहे.

सातव्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात भगवंतांनी आपणाला जाणण्याची गोष्ट मुख्य सांगितली आणि नवव्या अध्यायात चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्पण करण्याची गोष्ट मुख्य सांगितली आहे.

**परिशिष्ट भाव—**या श्लोकात अहंता परिवर्तनाची गोष्ट मुख्य आहे. भक्त 'मी भगवंताचा आहे'—अशा प्रकारे आपल्या अहंतेला बदलतो आणि स्वतःचा संबंध भगवंताशी जोडतो. तो साधननिष्ठ न होता भगवन्निष्ठ होतो. म्हणून त्याला संसाराचा त्याग करावा लागत नाही तर तो आपोआप सुटतो. कारण वर्ण, आश्रम, जाती, योग्यता, अधिकार, कर्म, गुण इत्यादीचा भेद असूनही हे सर्व आगंतुक आहेत. परंतु स्वतःशी भगवंताचा संबंध आगंतुक नाही तर अनादी, नित्य आणि स्वतःसिद्ध आहे.

*ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥*

**अशा प्रकारे ॐ तत् सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात ''राजविद्याराजगुह्ययोग'' नावाचा नववा अध्याय पूर्ण झाला ॥ ९ ॥**

या अध्यायात भगवंतांनी जे ''**मया ततमिदं सर्वम्**'' इत्यादी उपदेश केला आहे तो सर्व विद्यांचा राजा आहे आणि भगवंतांनी स्वतः आपण आपल्याला प्रगट करून अर्जुनाला आपणास शरण होण्यासाठी आणि आपल्या ठिकाणी मन लावण्यासाठी जे म्हटले आहे ते संपूर्ण गोपनीय भावांचा राजा आहे. या दोन्हीना (राजविद्या आणि राजगुह्य) तत्त्वाने समजून घेतल्यावर योगाचा (नित्ययोग) अनुभव येतो. म्हणून या अध्यायाचे नाव ''राजविद्याराजगुह्ययोग'' ठेवले गेले आहे.

## नवव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात ''**अथ नवमोऽध्यायः**'' ची तीन ''**श्रीभगवानुवाच**'' ची दोन, श्लोकांची चारशे सेहेचाळीस आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग चारशे चौसष्ट आहे.

(२) ''**अथ नवमोऽध्यायः**'' ची सात, ''**श्रीभगवानुवाच**'' ची सात, श्लोकांची एक हजार एकशे बारा आणि पुष्पिकेची एक्कावन अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एकहजार एकशे सत्याहत्तर आहे. या अध्यायाच्या चौतीस श्लोकांपैकी वीसावा आणि एकवीसावा हे दोन श्लोक चौवेचाळीस अक्षरांचे आहेत आणि बाकीचे बत्तीस श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात एक उवाच ''**श्रीभगवानुवाच**'' आहे.

## नवव्या अध्यायाचे प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या चौतीस श्लोकांपैकी वीसावा आणि एकवीसावा हे दोन श्लोक ''**उपजाति**'' छंदाचे आहेत. बाकी राहिलेल्या बत्तीस श्लोकांपैकी पहिल्या श्लोकाच्या प्रथम चरणात ''भगण'' आणि तृतीय चरणात ''नगण'' प्रयुक्त असल्याने ''**संकीर्ण-विपुला**'', दुसऱ्या श्लोकाच्या प्रथम चरणात ''रगण'' प्रयुक्त असल्याने ''**र-विपुला**'', तीसऱ्या आणि दहाव्या श्लोकांच्या प्रथम चरणात ''भगण'' प्रयुक्त असल्याने ''**भ-विपुला**'', सतराव्या श्लोकाच्या प्रथम चरणात आणि तेराव्या तसेच सव्वीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात ''नगण'' प्रयुक्त असल्याने ''**न विपुला**'' संज्ञेचे छंद आहेत. बाकीचे पंचवीस श्लोक ठीक ''**पथ्यावक्त्र**'' अनुष्टुप् छंदाच्या लक्षणांनी युक्त आहेत.

# नवव्या अध्यायाचे सार

भगवंताने सातव्या अध्यायापासून 'ज्ञान' आणि 'विज्ञान' यांचा विषय सांगणे आरंभ केले आहे. 'ज्ञाना' ने संसारातून मुक्ती होते आणि 'विज्ञाना' ने भगवंतात प्रेम निर्माण होते. मध्यात अर्जुनाने प्रश्न केल्यामुळे आठव्या अध्यायात दुसरा विषय चालू झाला. परंतु नवव्या अध्यायापासून भगवान् पुन्हा तोच विषय सांगणे आरंभ करतात.

सातव्या अध्यायात भगवंताने संसाराच्या उत्पत्तीचे कारण सांगितले की, परा आणि अपरा—या माझ्या दोन्ही प्रकृतीच्या संयोगापासूनच संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती होते. (७। ६). परंतु नवव्या अध्यायात संसाराची स्थिती सांगतात की, ज्यांच्या दृष्टीत संसाराची सत्ता आहे, त्या साधकांसाठी संसार माझ्यात आहे आणि मी संसारात आहे (९। ४-६). यालाच सहाव्या अध्यायात म्हटले आहे—'**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति**' (६-३०) परंतु ज्या सिद्ध महापुरुषांच्या दृष्टीत संसाराची स्वतंत्र सत्ता नसते, त्यांच्या दृष्टीत एक मीच मी असतो—'**वासुदेवः सर्वम्**'.

भगवान् म्हणतात की, जरी संपूर्ण प्राण्यांना उत्पन्न करणारा आणि धारण करणारा मीच आहे, तरीही मी त्या प्राण्यांच्या आश्रित नाही उलट ते प्राणीच माझ्या आश्रित आहेत (९। ५). जसे आकाशात विचरणारा वायू आकाशाच्या आश्रित असतो, परंतु आकाश वायूच्या आश्रित नसते, तसेच परा आणि अपरा-प्रकृती तर भगवंताचा स्वभाव असल्यामुळे भगवंताच्या आश्रित (अधीन) आहेत, परंतु भगवान् परा आणि अपरा-प्रकृतीच्या आश्रित नाहीत. म्हणून जसे वायू आकाशापासूनच उत्पन्न होतो, आकाशातच स्थित राहतो आणि आकाशातच लीन होतो, तसेच संपूर्ण प्राणी महासर्गात भगवंतापासूनच प्रकट होतात, भगवंतातच

स्थित राहतात आणि महाप्रलयात भगवंतातच लीन होतात (९।७). तात्पर्य, संपूर्ण प्राणी प्रकृतीच्या आश्रित असतात आणि प्रकृती भगवंताच्या आश्रित असते (९।८). दुसऱ्या शब्दात, भगवंताच्या एका अंशात प्रकृती असते आणि प्रकृतीच्या एका अंशात प्राणी असतात. म्हणून सृष्टीची रचना करूनही भगवान् सृष्टि-रचनारूपी कर्मांने बांधले जात नाहीत (९।९). कारण वास्तविक सृष्टि-रचनेचे कार्य भगवंताच्या आश्रित राहणारी प्रकृतीच करते (९।१०). हे रहस्य न जाणल्यामुळे बेसमज-लोक भगवंतालाही आपल्याप्रमाणे शरीराचा (अपराचा) आश्रित मानतात की, जसे आपण शरीराविना राहू शकत नाही, तसेच भगवान्ही शरीराविना राहू शकत नाहीत (९।११). असे लोक आसुरी, राक्षसी आणि मोहिनी प्रकृतीच्या आश्रित राहणारे असतात (९।१२). वास्तविक जसे मनुष्यात शरीर आणि शरीरीचा भेद असतो तसेच भगवंतात शरीर-शरीरीचा भेद नसतो—**'सदसच्चाहमर्जुन'** (९।१९). म्हणून जी माणसे भगवंताला प्रकृतीच्या आश्रित समजत नाहीत, ते दैवी प्रकृतीच्या आश्रित राहणारे असतात अर्थात् ते प्रकृतीच्या आश्रित न राहता भगवंताच्या आश्रित राहतात (९।१३). भगवंताच्या आश्रित असल्यामुळे ते 'महात्मा' म्हणविले जातात.

कर्मयोग 'शरीरा' च्या (अपराच्या) मुख्यतेने चालतो आणि ज्ञानयोग 'शरीरी' च्या (पराच्या) मुख्यतेने चालतो. एका देशाला (शरीर अथवा शरीरी ह्यांना) घेऊन चालण्याने कर्मयोगी आणि ज्ञानयोगी एकदेशीय असतात. परंतु भक्तियोग भगवंताच्या मुख्यतेने चालतो. म्हणून भक्ताला भगवंताने 'महात्मा' अर्थात् महान् आत्मा म्हटले आहे. ते अनन्यमनाने भगवंताचे भजन करतात. कारण जर त्यांच्या एका भगवंताशिवाय दुसऱ्याची स्वतंत्र सत्ता नाहीच तर मग त्यांचे मन भगवंताला सोडून कुठे जाईल? म्हणून ते भगवंताला नित्ययुक्त राहतात, कधी भगवंतापासून वेगळे होतच नाहीत—**'नित्ययुक्ताः'** (९।१४), **'नित्याभियुक्तानाम्'** (९।२२).

साधक अनेक प्रकारचे असतात आणि वेग-वेगळ्या साधनेने वेग-वेगळ्या उपास्य देवतांची उपासना करतात. परंतु वास्तविक त्या साधकांद्वारा एकाच समग्र भगवंताची उपासना होते—**'मामुपासते'** (९।१५), **'त्रैविद्या माम्'** (९।२०), **'तेऽपि मामेव'** (९।२३), **'अहं हि सर्व यज्ञानां भोक्ताच प्रभुरेव च'** (९।२४). कारण एकच भगवान् अनेक रूपाने प्रकट झाले आहेत (९।१५-१९) हे रहस्य न समजल्यामुळे जे लोक आपल्या उपास्य देवतेला भगवंताहून वेगळे मानून सकामभावाने त्यांची उपासना करतात, त्यांची उपासना वास्तविक भगवंताची असूनही अविधीपूर्वक होते. म्हणून त्यांचे पतन होते अर्थात् ते जन्म-मरणाला प्राप्त होतात (९।२३-२४). परंतु भगवंताची उपासना करणारे भगवंतालाच प्राप्त होतात.

जे लोक भगवंताला सोडून दुसऱ्या देवी-देवतांची उपासना करतात, त्यांना अनेक नियम, विधी इत्यादींचे पालन करण्याची आवश्यकता असते, ज्यामुळे खूप कष्ट सोसावे लागतात. परंतु भगवंताच्या उपासनेत भावाची जरूरी आहे, क्रियांची (नियम, विधी यांची) जरूरी नाही (९।२६-२७). भगवान् क्रियाग्राह्य नाहीत तर भावग्राही आहेत—**'भावग्राही जनार्दनः'** म्हणून भक्ताला भगवंताची प्राप्ती सुगमतापूर्वक होते. एवढेच नव्हे मनुष्य कोणत्याही आचरणाचा, वर्णाचा, आश्रमाचा जातीचा असेना का तो भगवंताचा भक्त होऊन सुगमतापूर्वक भगवंताला प्राप्त होऊ शकतो (९।३०-३३).

नवव्या अध्यायाच्या शेवटी भगवान् म्हणतात—**'मन्मना भव०'** (९।३४). याचे तात्पर्य, जे काही आहे ते मीच आहे, माझ्याशिवाय काहीही नाही (७।२९-३०). ही गोष्ट दृढतेने स्वीकार करणे हेच **'मन्मना भव०'** इत्यादी पदांचे तात्पर्य आहे.

